

# वृंदा टक

## मराठ्यांच्या र  भक्तीची कमाल.

हें

ऐतिहासिक नाटक

विष्णु लक्ष्मण काळे

अ. मास्तर लं. मिश.  हूल

बेळगांव

( जिजीवास, सद्बोधरत्नमाळा, व्या. रण

हिंदुस्थानचा इतिहास वगैरे पुस्तकांचे कर्ते )

यांनीं लिहिलें




तें

"श्रीरामतत्व प्रकाश" छापखान्यांत

छापून प्रसिद्ध केलें.

---000---

सन १९०४ इसवी.



किंमत ०।१२ आणे.

श्रीरघुवीर.

श्रीमंत माधवराव मोरेश्वर

पंतअमात्य

ऊर्फ

# बाळासाहेब बावडेकर

यांस

त्याचें औदार्य, त्याचें गुणग्राहकत्व,

त्यांची विद्वत्ता व त्यांच्या इतर

सद्गुणांस

लुब्ध होऊन

हें पुस्तक

ग्रंथकर्त्यानें

अत्यंत सन्मानपूर्वक

अर्पण केलें आहे.

# वृंदा नाटक.

अथवा

# मराठ्यांच्या स्वामिभक्तीची कमाल.

## अंक पहिला.

### मंगलाचरण

( पद—सांब सुराभरणा या. चा० )

ईशा, भवनाशा, पावे, दाउनियां करुणा।
शुकसनकादिक नमिती ज्यातें सदय
उमारमणा ॥ धृ० ॥ त्रिपुरांधकगज हे
जगतीं असुर मत्त झाले। मर्दुनियां त्यांतें
शांतीसौख्य जनां दिधलें। सीमा नच
तव औदार्यासी जन्म-मृत्यु-हरणा ॥ धृ० ॥
॥ १ ॥ पूर्वपुण्यश्लोका, निगमा, न कळे
तव महिमा। शुद्धतत्व विलसे रूपीं प्रभु-
वर सुख धामा। स्वीकृतकार्यीं यश मज
द्यावें, शरण तुझ्या चरणा ॥ धृ० ॥ २ ॥

( अशी नांदी झाल्यावर **सूत्रधार** पडद्याबाहेर येतो. )

**सू०**—शुद्ध व प्रेमळ अंतःकरणानें इतकें ईशस्तवन
केलें तरी पुरें आहे. बरें; पण माझा मित्र विदूषक

अद्याप कां बरें आला नाहीं! त्याला मी बोलावूं पाठवूनही बराच वेळ झाला.

( विदूषक प्रवेश करितो. )

वि०—नमोन्नमः नमोन्नमः सूत्रधार साहेब! तुमची तर बुवा सदोदित लग्नघाई असते. ह्मटलें, बोलावण्यावर बोलावणीं हें आहे तरी काय! इतक्या जरूरीचें काम तें हेंच वाटतें! माझी तर कीं नाहीं, वाटेंत त्रेधा त्रेधा उसळून गेली अगदीं. काय सांगू! अर्ध्या वाटेपर्यंत आलों तसाच बोडका, आणि मग झाली पागोट्याची आठवण!

सू०—बरें मग?

वि०—मग काय मग! मी मोठ्या बुचकळ्यांत उर्फ पंचायतींत पडलों होतों! पण इतक्यांत झाली बुवा अश्वत्थकट्टी पिंपळाचार्यांच्या शास्त्राधाराची आठवण.

सू०—तो कोणता शास्त्राधार? सांग तरी पाहूं!

वि०—कोणता ह्मणजे! शेंडींत एकतुळशीपत्र घातल्यानें जर गांवांत बोडक्यानें पाहिजे तिकडे फिरतां येतें, तर झाडांचीं झाडें डोकीस गुंडाळल्यानें रंगभूमीवर येण्यास कोणती हरकत आहे? तेव्हां रस्त्यांत बनविलें हें हिरवें पागोटें नी काय! पण इत-

क्या तारंबळीनें येथें येऊन पाहतों, तों तुह्मीं आपल्याच लंबकर्ण सुराच्या नादांत !

सू०—भले खाशी !! विदूषकराव, खूपच बहार उडविलीत ह्मणावयाची! आजपर्यंत काय तीं सप्त सुरांचीच नांवें लोकांना माहीत होतीं. हा लंबकर्ण सूर नव्हता कोठें कोणाच्या ऐकिवांत! हा आपल्याला कोणत्या ग्रंथांत आढळला बरें?

वि०—( मोठ्यानें हंसून ) मित्रा लंबकर्ण सूर ह्मटला ह्मणून रागावलास वाटतें? सूत्रधार, त्याचा अर्थ वाईट नाहीं. लंबकर्ण सूर ह्मणजे जो सूर ऐकण्याकरितां लोक आपले कान लंब उर्फ पुढें करितात, ह्मणजे मोठ्या हौसेनें ऐकतात तो; असा समास सोडवावयाचा त्या शब्दाचा, समजलांत? तेव्हां लंबकर्ण सूर ह्मणजे मधुर गायन इत्यर्थः !

सू०—वाहवा! वाहवा! कोण जबर विद्वत्ताही!

वि०—विद्वत्ता ह्मणजे! उगीच नाहीं; ॥ रामू, हरी, करी भरित ॥ हा रूपावळींतील पहिला श्लोक बारान् बारा चोवीस वर्षें पाठ करीत होतों! असो; पण मित्रा, आज येथें इतके लोक कां बरें जमले आहेत?

सू०—अरे, आज मी येथें " वृंदा अथवा मराठ्यांच्या स्वामिभक्तीची कमाल " या नाटकाचा प्रयोग करून दाखविणार आहें. तो पाहण्याकरितां ही रसिक

जनांची इतकी दाटी झाली आहे समजलास? अशा वेळीं तूं मला साहाय्य केलें पाहिजे.

वि०—सूत्रधार, अशा ऐतिहासिक नाटकाच्या प्रयोगांत माझ्या हातून साहाय्य झालें नाहीं, असें कधीं झालें आहे काय? इतिहास ह्मणजे माझा लहानपणापासूनचा आवडता विषय. मित्रा, शिवाजी महाराज आणि टिपू सुलतान यांच्या मध्यें स्वातंत्र्याकरितां वीस वर्षें जें घनघोर युद्ध चाललें होतें, त्या वेळचाच हा तुमचा ऐतिहासिक भाग असेल नव्हे?

सू०—काय? शिवाजी महाराज आणि टिपू सुलतान यांचें युद्ध! एकूण तुझें ऐतिहासिक ज्ञान फार अलोट दिसतें! अरे शिवाजी महाराज कधीं होऊन गेले आणि टिपू सुलतान कधींचा, याचें तुला कांहीं भान आहे का?

वि०—हातृतिचारे! शिवाजी महाराजना? ते सन १६८० त जन्मले आणि १६२७ त वारले, ही गोष्ट महाराष्ट्रांतील गुराख्यांच्या पोरांना देखील माहीत आहे; मग मी ती कशी विसरेन?

सू०—ठीक ठीक! शिवाजी महाराजांचा जन्म १६८० त आणि मृत्यु १६२७ त ना? भले खाशी! आधीं मरून मग जन्मास आले वाटतें!

वि०—अहो राव, यांत तुह्मांला इतकें आश्चर्य तें कसलें वाटलें? लहानपणीं तुह्मीं इतिहास पाठ केलेला

विसरलांत काय ? आपल्या मतें तुह्मीं मला अगदीं वेडा ठरविलात! पण हिंदुस्थानच्या इतिहासाच्या आरंभींच शिकंदर बादशाहाचा जन्म ३६८ त व मृत्यु ३२४ त असें पाठ केलेलें मला पक्कें स्मरतें बुवा!

सू०--होय! तें सगळें खरें. पण शिकंदराची गोष्ट इसवी सनापूर्वींची आणि शिवाजी महाराजांची इसवी सनानंतरची, याचें तुला कांहीं भान आहे कीं भांबावलास?

वि०--भांबावलों? कोण तुह्मीं कीं मी! इसवी सना नंतरची असली काय, किंवा पूर्वींची असली काय सारखेंच. कारण, केव्हांची असली तरी दिवस चोवीस तासांचाच कीं नाहीं!

सू०--ठीक ठीक! तुझ्या ह्या इतिहासाच्या ज्ञानाची आणि तर्कशास्त्राची कमाल आहे खरी!

वि०--कमाल असूंदे किंवा कबीर असूंदे. पण मित्रा, खरेंच सांग कीं, आपले अतुलप्रतापि शिवछत्रपति अमरकीर्तिरूपदेह धारण करून सन १६८० त जन्मास आले, ही गोष्ट खोटी कीं खरी!

सू०--शाबास शाबास! आतां मात्र शहाण्या माणसा सारखें बोललास यांत संशय नाहीं. असो; त्याच वीरकुलावतंस शिवछत्रपतीच्या मागें, कलुषशाहींत औरंगजेबानें संभाजी महाराजांस कैद करून नेऊन निर्दयपणें त्यांचा वध केला व त्यांच्या

बायकामुलांस आपल्या छावणींत नेलें, ही इतिहास प्रसिद्ध गोष्ट तुला माहीत असेलच. त्यानंतर मोंगल बादशहा स्वतः दक्षिणेंत छावणी देऊन कित्येक वर्षें बसला होता. त्यानें मराठ्यांची सत्ता धुळीस मिळविण्याचे कामीं मोठ्या नेटानें अगदीं मरेपर्यंत एक सारखा यत्न केला, पण त्यांत त्याला यश आलें नाहीं. मराठ्यांच्या इतिहासांतील अति महत्वाचा जो काल तो हाच होय. संभाजीच्या वधापासून शाहू साताऱ्च्या गादीवर बसे पर्यंत जीं वीस वर्षें गेलीं त्या वीस वर्षांच्या हकीकतीनेंच महाराष्ट्र देशाच्या इतिहासास शोभा आली आहे. कारण, या वीस वर्षांच्या अवधींत आपल्या जन्मभूमीवर अश्रुतपूर्व अशीं अनेक संकटें ओढवलीं असतां तशा आणिबाणीच्या प्रसंगीं अनेक मराठे वीरांनीं व त्या वेळच्या ब्राह्मण मुत्सद्यांनीं विलक्षण कर्तबगारी बजावून काळाच्या जबड्यांत सांपडलेलें स्वराज्य सोडविलें, ही लहान सामान्य गोष्ट नव्हे. त्या काळीं स्वराज्याचें रक्षण झालें नसतें, तर औरंगजेबानें हिंदुपदपादशाहीचा पाया खणून टाकून त्याच्या खाणाखुणा देखील राहूं दिल्या नसत्या. तर अशा ह्या अप्रातिम व प्रत्येक महाराष्ट्रियानें अभिमान बाळगण्याजोग्या कारकीर्दीपैकींच मनोरंजक भाग आजच्या नाटकाचें कथानक असल्यामुळें आजचा प्रयोग पाहून तुझ्या मनाला खरा

आनंद झाल्यावांचून राहणार नाहीं. चल तर आतां मजबरोबर कर्नाटकांत; ह्मणजे मराठ्यांमध्यें दुफळी उत्पन्न करण्याकरितां मोंगल बादशहाचीं काय काय कारस्थानें चाललीं आहेत तीं तुझ्या सहज दृष्टीस पडतील.

वि०—मित्रा, चल तर. तारायंत्रावर बसून आपण डोळ्याचें पातें लवण्याच्या आंत कर्नाटक गांठूं.

( दोघेही जातात. )

---

## प्रवेश १ ला.

( हणमंतराव प्रवेश करितो )

हण०—( आपल्याशीं ) काय करावें ! मनाला कितीही दाबलें तरी तें पुनःपुनः उचल खातेंच. त्यांतून त्या दुत्ताजीला पाहिलें कीं तळव्याची आग मस्तकास पोंचून हृदयांत द्वेषाग्नि भडकतो आणि असें वाटतें कीं त्या द्वेषबुद्धीच्या भरारींत माझ्या हातून एखादें भलतेंच कृत्य तर नाहींना होणार ! झाला तो प्रकार होऊन गेला; आतां त्याविषयीं मत्सर केल्यानें हित होणें तर शक्य नाहींच; पण उलट अहित होण्याचा संभव फार. ह्या सगळ्या गोष्टी मला कळत नाहींत असें नाहीं; पण मनुष्यस्वभाव आहेना ? बरें; स्वभावाला दोष द्यावा तरी मूर्खपणा आपल्याच पदरीं येतो. कारण धैर्य, शौर्य, कर्तबगारी इत्यादि सर्व बाजूंनीं माझी यो-

ग्यता दत्ताजीपेक्षां हजार पटीनीं जास्त असतां संताजीरावांसारख्या अनुभवी व धूर्त सेनापतींनीं जेथें दत्ताजीच्या बाह्यात्कारी गुणांस भुलून त्याला सुभेदारी दिली, तेथें माझ्या ठिकाणीं दुसरा कितीही उत्तम स्वभावाचा मनुष्य असता, तरी त्याच्या मनाची हीच स्थिति झाली असती. तेव्हां दुसऱ्यांच्या अन्यायासाठीं आपल्या स्वभावाला तरीं कां दोष द्या ! या काळांत कोठेंही चला; मिठ्या मिठ्या भाषणानें वरवर इमान दाखविणें व आंतून मतलबावर नजर ठेवणें, हाच सद्गुण होऊन बसला आहे. तेव्हां त्याच गुणाचा अंगिकार करावा आणि झालेली मानहानि गिळून स्वस्थ बसण्यापेक्षां या हणमंतरावाच्या आंगांत विलक्षण करामत आहे असें त्या अक्कलशून्य व ओंठ पिळल्या असतां दूध निघणाऱ्या पोराला व हेकेखोर स्वभावाच्या आपल्या सेनापतिसाहेबांना एकवार दाखवावें. मुद्दाम कांहीं सरकारी कामाचें निमित्य काढून मला उदईक जिंजीस पाठविण्याची सेनापतींनीं जी मसलत काढिली आहे, तींत त्यांचा कांहीं हेतु असला तरी ती त्यांची मसलत या वेळीं माझ्या पथ्यावरच आहे. सिधोजीरावासारख्यांनीं माझ्याकरितां आपली भीड खर्चून सुभेदारीबद्दल माझी शिफारस केली असतांही त्यांच्या शब्दाचा देखील मान झाला नाहीं, हें एकप्रकारें बरेंच झालें ह्मणावयाचें. कारण त्याच्या योगानें पुढें-मागें मीं मनांत आणिलेल्या का-

रस्थानाला दुजोरा येण्याचा संभव आहे. असो; जिंजीस गेल्यावर तेथें आजारीपणाचें सोंग घेऊन आठ पंधरा दिवस मुक्काम काढावयाचाच. तेवढ्या अवकाशांत बुद्धिबळाच्या निमित्तानें महाराजांची गांठ दोनचारदां तरी सहज पडेल. मग पाहूं माझी अक्कल कोठवर काम करिते आणि कसकसा योग जुळून येतो तो! मत्सर आणि महत्वाकांक्षा, मानीपणा आणि अदूरदृष्टि हीं सर्वी बहीणभावंडें जगांत नांदताहेत तोंपर्यंत कारस्थानांना काय कमी? फक्त तीं लढविण्याचें आंगांत पाणी मात्र पाहिजे! ठीक आहे. आतां येथून नीट घरींच जावें आणि उद्यांच्या तयारीस लागावें. (निघून जातो)

---

## प्रवेश २ रा.

### स्थळ—जिंजीच्या वाड्यांतील दिवाणखाना.

(राजाराममहाराज निळोपंत व खंडो बल्लाळ चिटणीस बोलत बसले आहेत.)

रा०—निळोपंत, साताऱ्यास रामचंद्रपंतांना थैली लिहावयास सांगितल्याप्रमाणें ती लिहिली कीं नाहीं अद्याप? हुकुमतपन्हांच्या लिहिण्यावरून मिरज व सोलापूर प्रांतीं शत्रूंचा सुळसुळाट अजून कमी झाला नाहीं असें दिसतें.

नि०—हुजूरहुकमाप्रमाणें हुकमतपन्हा रामचंद्रपंतांना

काळच थैली गेली. सरलष्कर सिधोजीराव निंबाळकरांची त्या प्रांतीं नेमणूक झाल्यावर आतां ते स्वतांच्या जवामर्दीनें शत्रूंचा नकशा उतरल्या वांचून खचीत राहणार नाहींत.

चि०—शिवाय, परशुरामपंत त्यांच्या मदतीस आहेतच. त्यांचा मूळचा पेशा जरी कारकुनी असला तरी हुकुमतपन्हांच्या हाताखालीं त्यांनीं तलवारबहादूरीचाही ओनामा गिरविला आहे. पुरंदर किल्ला सर करितांना इतर मराठे सरदार जरी होते, तरी शत्रूंना हिकमतीनें कैचींत आणून किल्यावर जोराचा हल्ला करण्याचे कामीं परशुरामपंतानीं आपल्या कावेबाजपणाची व मर्दुमकीची कमाल करून सोडिली, असें रामचंद्रपंतानीं स्वतां लिहिलें आहे.

रा०—होय; पन्हाळगड शत्रूंच्या हातून सोडवितांनाही परशुरामपंतांनीं खरी शिपाईगिरी गाजवून सर्जेखानासारख्या काबील सरदारास चाकित केलें होतें. व ह्मणूनच प्रल्हादपंतांमागें प्रतिनिधि पद रामचंद्रपंतास देऊन त्यांचें हुकूमतपन्हा पद परशुरामपंतांस द्यावें असें माझ्या मनांत होतें.

चि०—सरकार, झालेली व्यवस्थाच ठीक झाली. कारण ऐन आणीबाणी प्रसंगीं मराठ्यांची गादी महाराष्ट्रांतून हालवून ती कर्नाटकांत आणण्याचे कामीं प्रल्हादपंतांनीं जे श्रमसायास केले व भर तुफानांतून स्वराज्याचें तारूं विनधोक पार पाडून आ-

पल्या आंगच्या आटोकाट शहाणपणानें त्याचा पूर्ववत् दरारा बसविला, त्या त्यांच्या स्वामिभक्ति परायणतेबद्दल त्यांच्या चिरंजीवानांच त्यांचें प्रतिनिधि पद देणें योग्य होतें. निराजीरावामध्यें जरी वडिलाइतकें पाणी नसलें, तरी स्वराज्याच्या अभ्युदयार्थ देह झिजविला असतां सरकारच्या मनांत कृतज्ञबुद्धि वागते इतकें लोकांना समजलें, ह्मणजे प्रसंगीं जड जोखमीचीं कामें बजावण्यास सर्व लोक तयार असतात. निराजीरावास जरी प्रतिनिधि पद मिळालें तरी तें नांवचें. महाराष्ट्रांतील राज्यकारभाराचीं खरीं सूत्रें रामचंद्रपंतांच्याच हातीं आहेत. तेव्हां त्यांना विषाद वाटण्याचें मुळींच कारण नाहीं.

रा०—हो, तेंही खरें; पण चिटणीस, जिंजी सर करण्याचेकामीं बादशहानें पुन्हां झुल्फीकारखानाची नेमणूक केली अशी जी शत्रूंच्या छावणींतून काल बातमी आली आहे, ती कितपत खरी आहे याबद्दल चौकशी करावयास सांगितल्याचें काय झालें?

चि०—मी व निळोपंत आतां तिकडेच निघालों आहों. एकदां अपमान झाल्यावर परत झुल्फिकारखान ती कामगिरी पतकरील असें संभवत नाहीं. पण नेम काय? बादशहाचा हुकूम तो! शोधाअंतीं काय असेल तें समजेलच. आतां निरोप असल्यास.

रा०—ठीक आहे. तुह्मी जा. शत्रूकडील बातमी संबंधानें मात्र अगदीं दुर्लक्ष करितां कामानये. ( चिटणीस व निळोपंत गेल्यावर हणमंतराव प्रवेश क-

रितो व मोठ्या अदबीनें रामराम करून एकेबाजूस उभा रहातो. ) काय हणमंतराव, कालचे डाव खरोखरच मोठे मजेचे झाले. रामभट्टजीनीं तुमची तीन चारदां आठवण काढिली होती. पण तुह्मीं आलां नाहीं, तेव्हां ह्मटलें पुनः तापचीप आला असेल.

ह०—छेः ! सरकारची या सेवकावर इतकी कृपादृष्टि असल्यावर ताप आला ह्मणून तरी मी त्याला जुमानतों आहे थोडाच ! उद्ईक परत जावयाचें; तेव्हां मंडळींचा निरोप वगैरे ध्यावयाचा होता ह्मणून नाहीं बनलें इकडे यायला. तापचीप कांहीं नाहीं.

रा०—हणमंतराव, ताप नसला तरी आंगीं चांगला तखवा वाटल्यावांचून जाणें बरें नव्हे. आणखी चार दिवसांनीं गेलांत तरी देखील चालेल. वाटेचें काम रस्त्यांत पुनः प्रकृति बिघडली तर पंचाईत.

ह०—सरकार, पंचाईत कसली ! आह्मांसारख्या नोकरांनीं प्रकृतीची इतकी बडेजाव राखली तर सरकारी कामें कशीं आमच्या हातून निभावतील ? आणि तीं निभावलीं नाहींत तर आह्मांला कोण विचारणार मग ! त्यांतून वरिष्ट अधिकारी संभाळून घेणारे असले तर एखादे वेळीं प्रकृतीची सबब आणि बिबब. आमच्या सेनापतिसाहेबांचा स्वभाव किती करारी आणि कितपत तापट आहे, हें हुजूरला माहीत असेलच. त्यांच्या कदरेपुढे कुठली प्रकृति आणि कुठली विकृति ?

रा०—सेनानायकत्व ह्मटलें ह्मणजे त्या ठिकाणीं तशी कदर असावीच लागते, गोविंदराव! नाहीं तर पदरचे हजारों लोक हुकुमतींत कसे ठेवितां येतील? पण प्रकृति बिघडल्यामुळें परत जाण्याला दोन दिवस उशीर लागला ह्मणून सेनापति रागावतील असें मला नाहीं वाटत. हवें असल्यास उद्यांच्या थैलींत तुमच्या संबंधानें चिटणीस सेनापतींना लिहितील ह्मणजे झालें.

ह०—सरकार, सारें होईल खरें; पण माझ्या स्वभावाला उगीच कोणाकडून फट्ट ह्मणून घेणें नको. वाटेंत प्रकृति जास्त बिघडली आणि कांहीं बरेंवाईट जरी झालें तरी पत्करलें. पण वरिष्ठांचा घुस्सा झालेला माझ्यानें नाहीं पाहवत. त्यांतून हुजूरापर्यंत दाद घ्यावून मी येथें राहिलों, असें भलतेंच कोणाच्या मनांत येणें या दिवसांत बरोबर नाहीं. कारण, त्याच्या योगानें वरिष्ठांची मर्जी जास्त बिघडून गरीबांचें एखादे वेळीं नुकसान व्हावयाचें.

रा०—हणमंतराव, तुमच्या प्रकृति संबंधानें तुह्मांला मी चार दिवस रहा असें ह्मटलें ह्मणून कोणी तुमचें नुकसान करावयास तयार होईल, असें तुह्मांस वाटतें काय?

ह०—छेः छेः तसें नव्हे सरकार! पण आतां पूर्वींचे दिवस नाहींत. धनीसाहेबांना माहीत असेलच कीं प्रल्हादपंत परलोकवासी झाल्यापासून आमच्या सेनापतिसाहेबांची तब्बेत विशेषच नाजूक बनली आहे. मग कारण काय असेल तें असो.

रा०—दुसरें कारण तें काय असावयाचें? पूर्वींप्रमाणें ते लिहितील तें प्रमाण, असें आतां नाहीं चालत. प्रल्हादपंत असेपर्यंत ते त्यांचा हेका चालवीत व त्यांच्याकडे पाहून आह्मांलाही स्वस्थ बसावें लागे. ते ह्मणत कीं सेनापति संताजीराव ह्मटले ह्मणजे युद्धकलेंत केवळ भीष्माचार्य. त्यांच्या सारखा मोहरा मराठेशाईला लाभला आहे, हें स्वराज्याचें मोठे भाग्य.

ह०—धनी साहेब, तें प्रल्हादपंतांचें ह्मणणें अक्षरशः खरें. कारण आपले सेनापति तसेच पराक्रमी आहेत. शत्रु देखील त्यांच्या शौर्याची तारीफ करतात. रण वाद्यांचा घनघोर शब्द कानीं पडून एकदां त्यांच्या आंगीं वीरश्री संचारली, कीं प्रत्यक्ष काळाला देखील ते अजिंक्य. स्वभावांत तेवढा तिखटपणा नसता, ह्मणजे त्यांच्या गुणाला मोल नव्हतें.

रा०—हणमंतराव, असें आहे ह्मणूनच नेहमी नाहीं तरी कित्येक वेळ त्यांच्या हेकट स्वभावाकडे काना डोळा करावा लागतो. केव्हां नरम आणि केव्हां गरम अशा रीतीनें त्यांच्याशीं वागत गेलों असतां मला खास वाटतें कीं, त्यांचा ताठ स्वभाव कांहीं दिवसांनीं बदलेल.

ह०—होय. सरकारच्या ह्मणण्याप्रमाणें तसें होईल यांत शंका नाहीं. पण स्वभाव बदलण्यांत देखील दोन प्रकार आहेत. आतां ह्या गोष्टी मजसारख्या

कमी दर्जाच्या मनुष्यानें आणि त्याही हुजूरच्या देखत काढणें, ह्मणजे लहान तोंडीं मोठा घांस घेणें होय.

रा०—यांत कसला आला आहे ' लहान तोंडीं मोठा घांस ' हणमंतराव? स्वभाव बदलून तो निवळतो तरी एक, नाहीं तर पूर्वीपेक्षां तो जास्त बेताळ होतो हें मला ठाऊक आहे. पण आपल्या वयो-वृद्ध सेनापतिसंबंधानें आतां तसा भलताच प्रकार होईल, असें मनांतही आणावयास नको.

ह०—धनीसाहेब तसें होऊं नये हीच सर्वांची इच्छा. कारण स्वराज्याच्या आजच्या स्थितीला तसें होणें मुळींच इष्ट नाहीं. पण कोणी नेम सांगावा? हट्टी स्वभावाच्या ठिकाणीं असंतुष्टपणाचें बीं तेव्हांच रुजतें. व एकदां असंतुष्टपणा उत्पन्न झाला, कीं त्याच्या पोटीं अप्रीतीला जागा मिळते, असा माझ्या कोत्या समजुतीचा अनुभव आहे. ओघाला आलें........

रा०—हणमंतराव, बोला पुरतें; मध्येंच कां थांबलात? तुमच्या बोलण्याचा मथितार्थ सर्वकांहीं आला माझ्या लक्षांत. सेनापतीच्या वर्तनासंबंधानें मला तसा कांहीं भास झाला होता, ह्मणूनच मी तरी तुह्मांला इतकें खोद खोदून विचारिलें.

ह०—माफी असावी सेवकाला अधिकोत्तराची. माझा स्वभाव पडला उतावीळ. तेव्हां बोलण्याच्या नादांत

मान न राहतां जरी कांहीं माझ्या तोंडून भलतेच शब्द बाहेर पडले असले, तरी ते शुद्ध भोळसटपणाचे आहेत. मी सहज मनुष्यस्वभाव बोलून गेलों. त्याचा संबंध आपल्या वयोवृद्ध व ज्ञानवृद्ध सेनापतिसाहेबांकडे कांहीं देखील नाहीं. कारण त्यांचा अधिकार, त्यांची नेकी, स्वराज्याविषयीं त्यांची कळकळ व त्यांची कर्तबगारी अशी कांहीं बिनमोल आहे कीं, त्यांच्याविषयीं कोणाच्या मनांत भलता तर्क कधींही यावयाचा नाहीं; व कदाचित् आलाच, तरी तो बोलून दाखविण्याची कोणाची छाती व्हावयाची नाहीं

रा०—पण हणमंतराव, भीतीमुळें अशा गोष्टी दबून रहाणें केव्हांही चांगलें नव्हे. त्यापासून एखादे वेळीं स्वराज्याचें भलतेंच नुकसान होण्याचा संभव असतो. ह्मणून स्वराज्याच्या कल्याणाकडे लक्ष देऊन तुह्मीं कित्येक गोष्टी आडून आडून सुचविल्यात हें उत्तम.

ह०—( एकीकडे ) रंग खुलेल असें चिन्ह दिसतें. ( उघड ) धनीसाहेब, माझ्या वेडसरपणाच्या भाषणानें आपल्या मनाचा इतका घोंटाळा व्हावा हें माझें दुर्भाग्य; दुसरें काय! जग ह्मटलें ह्मणजे प्रकृति तितक्या विकृति असावयाच्याच. एखाद्याला एखादी गोष्ट वावगी किंवा चमत्कारिक वाटली, तरी ती तशी असतेच असा नेम नसतो. कारण, गोष्ट एकच खरी; पण ती दहांना दहा तऱ्हेनें भासते.



तेव्हां
त्याकडे
रा०—हण
गोष्ट
एके
श्रेयस्क
समजून
आपलें
ह०—अमुक
असें ह्म
पण बंद
राजा०—बे
ला जें
मनांत
केव्हांही
ह०—पण
षण हे
राजा०—म
तसें वाट
अमर्याद
यत्न क
एखादे
ह०—पण ध
आला ध
तीही गो

तेव्हां कर्तेपणा ज्यांच्या ठिकाणीं असतो, त्यांनीं त्याकडे विशेषसें लक्ष न देणें हें चांगलें.

रा०—हणमंतराव, तुह्मीं कांहीं जरी ह्मटलें तरी एवढी गोष्ट खरी कीं, थोर अधिकार आणि हेकेखोरपणा एके ठिकाणीं राहूं देणें, केव्हांही व कोणालाही श्रेयस्कर नाहीं. हेकेखोरपणा हा दुर्गुण आहे असें समजून तसा अनुभव आल्यावांचून कोणाच्याही हातून आपलें कर्तव्य योग्य रीतीनें बजावलें जात नाहीं.

ह०—अमुक एक गोष्ट अशी किंवा अमुक प्रकार तसा, असें ह्मणण्याचा या सेवकास मुळींच अधिकार नाहीं, पण बंद्याला माफी असल्यास........

राजा०—बोला; हणमंतराव, खुशाल बोला. ज्याला जें वाटतें तें त्यानें निर्भीडपणानें व कुडा भाव मनांत न आणितां खुशाल बोलावें. कारण त्यापासून केव्हांही व कोणाचेंही अनहित होण्याची भीति नसते.

ह०—पण सरकार, सरळ वर्तन आणि निर्भीड भाषण हे ह्या काळांत दुर्गुण मानिले गेले आहेत.

राजा०—मानणारे मानोत. पण हणमंतराव, मला मात्र तसें वाटत नाहीं. संताजीरावाचा दुराग्रही स्वभाव अमर्याद होऊं न देतां तो ताळ्यावर आणण्याचा यत्न करणें अगदीं जरूरीचें आहे. नाहींपेक्षां एखादे वेळीं अपाय व्हावयाचा.

ह०—पण धनीसाहेब, केव्हां केव्हां हट्टी स्वभावाला आळा घालणेंच अपाय कारक होतें. ह्मणून कोणतीही गोष्ट दूरवर नजर पोंचवूनच करावी लागते.

आपले सेनापतिसाहेब किंचित् हट्टी स्वभावाचे असले, तरी त्यांची लष्करी हुकुमत व त्यांच्या वीर्य-शौर्यादि गुणांची योग्यता दुसऱ्या कोणालाही या· वयाची नाहीं, ह्मणून ह्मणतों.

**राजा०**—हणमंतराव, तुह्मीं कांहीं जरी ह्मटलें तथापि सेनापतिसंबंधानें ज्या ज्या गोष्टी तुमच्या तोंडून व अन्य मार्गानें माझ्या कानीं आल्या आहेत, त्या सर्वांचा विचार हा मला केलाच पाहिजे. आपले जयसिंगराव (धनाजी जाधव) लष्करी पेशांत किंवा मर्दुमकींत सेनापतीपेक्षां रतीभर देखील कमी नसून त्यांच्या व यांच्या स्वभावामध्यें किती जमीन अस्मानाचा फरक आहे तो पहाना !

( शिपाई प्रवेश करितो. )

**शि०**—सरकार, बिजली घोडीवर सामान ठेवूनशानी खंडु वर्दी देन्यापायीं आलाया, आन किल्लेदार व मामासाबची अगशी वाट बघत्याती.

**राजा०**—बरें; हणमंतराव, आतां फिरावयास जाण्याची वेळ झाली. तुह्मीं उदईक जाणार ह्मणतां? ठीक आहे; वाटेनें संभाळून चला.

**ह०**—( मोठ्या आदबीनें उठून लवून राम राम करितो ) घेऊं तर आतां सरकारची परवानगी? शुद्ध अंतःकरणानें वागणाऱ्या ह्या गरीब सेवकावर एकादें किटाळ येऊं नये, एवढीच पायापाशीं शेवटची विनंति आहे. दुसरें काय?

( उभयतांही जातात. )

# प्रवेश ३ रा.

स्थळ–( ब्रह्मपुरी येथील बादशहाची छावणी )

( हणमंतराव खांद्यावर कावड घेतलेला प्रवेश करितो. )

ह०–( आपल्याशीं ) हातीं घेतलेली कामगिरी कठीण तर खरीच; पण पाहूंया कसं काय जुळतें तें. सरदार साहेबांची गांठ पडून या घेतलेल्या सोंगाची माझ्या हातून चांगली बतावणी झाली कीं, मिळविली. एका बोटावरची थुंकी दुसऱ्या बोटावर करून दाखवि-ण्याच्या कलेचा अभ्यास केल्यावांचून जगांत को-णाची हुंडी शिक्यावर चढली आहे? कारस्थान याचा अर्थच लुच्चेगिरीचा बाजार! ( इकडे तिकडे पाहून ) सरदार मान्यांचा तंबू हाच असावा. मोंगल छावणी ह्मणजे केवळ श्रीमंतीचा थाट ह्मणतात, तें कांहीं खोटें नव्हे. हा डामडौल आणि हीं चैनीचीं साधनें मराठ्यांच्या छावणींत कोठली दृष्टि पडाव-याला! हा पहारेकरी मुसलमान दिसतो. तेव्हां याला हिंदुस्थानी भाषेंत आपण विचारूं. जयसीता-राम, जयसीताराम! सिपायभाई, सरदार माने साहेब कोनसे तंबूमें रहते हैं?

पहारेकरी–सरदारसाहेब यही तंबूमे रहते सच. फिर तुमकू क्या करनेका है पूछकर? तुम कोन?

यात्रेकरू–भाई, मैं हिंदु फकीर हौं. इधर रामेश्वर-कू जातेहुवे आप सरदारसाहेबकी दयानत व दीनदारी सूनके ठंडीकेवास्ते कंबलका सवाल

करना ये आससे इतना दूर आन पोहोंचाहूं. फिर हराम फरमाके हुजूरमें गरीबकी इतला करवाये तो ए गंगा-माता तुमारा बोलबाला करेंगी.

पहा०—हमारे सरदार हिंदू फकैरकू खैरात देते है सच. फिर ये वख्त नहीं. (इतक्यांत आंतून नागोजीराव विचारतात.)

नागो०—कोण आहे? कादर, बाहेर कोण बोलतो आहे?

प०—खाविंद, कोई हिंदू फकैर आपकों मिलनेकेवास्ते चाहता है.

नागो० अच्छा, उसकू अंदर आने देव.

(नागोजीराव लोडाशीं टेंकून हुक्का पीत आहेत. असा पडदा उघडतो.)

यात्रे०—आपल्या सारख्या उदार अंतःकरणाच्या हिंदु सरदाराचें तो काशीविश्वनाथ सदा कल्याण करो.

नागो०—तुह्मी कोण व येथें येण्याचें कारण काय?

यात्रे०—सरदारसाहेब, मी एक गरीब यात्रेकरू आहें.

नागो०—हिंदू यात्रेकरूंनीं परक्यांच्या छावणींत येणें फार धोक्याचें आहे, हें तुह्मांला माहीत नाहीं वाटतें?

यात्रे०—महाराज, ही मुसलमानांची छावणी असली तरी आपल्या सारखे मराठे सरदार जोंपर्यंत त्यांच्या पदरीं आहेत, तोंपर्यंत हिंदूंना भीति कसली? आपली कीर्ति दूरवर ऐकून हे थंडीचे दिवस असल्यामुळें एखादी घोंगडी मिळेल या आशेनें मी

येथवर आलों. ही काशीची कावड आणिली आहे, ती रामेश्वरास घालावी असें मनांत आहे. पण थंडीनें निभावून तेथवर जाईन तेव्हां खरें.

**नागो०**—काय? ही कावड खांद्यावर घेऊन तुह्मी एकटेच रामेश्वरच्या यात्रेला चाललांत! ती यात्रा फार कठीण आहे ह्मणतात. सोबतीवांचून व मोठ्या जमावाशिवाय तिकडे कोणी जात नाहींत असें मी ऐकतों.

**यात्रे०**—होय महाराज; दूर देशांत सोबतीशिवाय प्रवास करणें चांगलें नव्हे. परंतु माझी प्रकृति अशक्त असल्यामुळें इतर यात्रेकरूंबरोबर माझा निभाव लागत नाहीं. ह्मणून मध्यें मध्यें मुक्काम करावा व विश्रांति घेऊन पुनः एखादी सोबत सांपडली कीं पुढें निघावें, असा माझा क्रम आहे.

**नागो०**—अशक्त मनुष्याला ही दूरच्या यात्रेची उठाठेव सांगितली होती कोणी? स्वस्थ कोठें तरी निवाऱ्यांत बसून ईश्वरोपासना केल्यानें कांहीं पुण्य कमी नाहीं लागत! ही कडाड थंडी आणि तुमची प्रकृति अगदीं अशक्त ह्मणतां, ह्मणून ह्मणतों.

**यात्रे०**—होय महाराज; आपण ह्मणतां तें कांहीं खोटें नाहीं. पण काशीला जाऊन कावड आणिली ती एकदां रामेश्वरापर्यंत पोंचविली, ह्मणजे मग खुशाल घरीं राम राम ह्मणत बसावयास मोकळीक झाली. आतां महाराष्ट्रांतील दंगाधोपाही बहुतेक संपला

आहे. तेव्हां सुखानें बसावयास स्वराज्याच्या छायेचा लाभही आतां महाराष्ट्रियांस लवकरच मिळेल. मग आह्मां ब्राह्मणांना कांहीं कमी नाहीं.

नागो०—काय भट्टजी, स्वराज्याबद्दलची घमेंड अजून तुमची संपली नाहीं वाटतें? आतां स्वराज्य होणें दुरापास्तच; आणि जरी झालें तरी त्यापासून सुख होईल, ही गोष्ट विसरा. आज मोंगलांच्या राज्यांत जें सुख आहे, तें कांहीं केल्या स्वराज्यांत होणें नाहीं. बादशहाच्या पदरीं राहून एखादी कर्तब-गारी केली तर त्याबद्दलची चीज होते; पण स्वरा-ज्यांत मोठी बहादुरी दाखविली तरी आपल्याच ज्ञातीबांधवांनीं आपला मत्सर करावा आणि मह-त्वाकांक्षेमुळें एकमेकांच्या नाशास उद्युक्त व्हावें, हेंच बक्षीस मिळावयाचें. आह्मांला दुसरा कोणी दडपता असला, तरच आह्मी मनुष्यांत असतों.

यात्रे० ( एकीकडे ) मला हेंच पाहिजे आहे. ( उघड ) महाराज, आपल्याला इतर गोष्टींत मजपेक्षां जगाचा अनुभव जास्त असेल. परंतु स्वराज्याविषयींचे हे आपले विचार समंजसपणाचे आहेत, असें मला वाटत नाहीं. मी बोललों असतों; पण ही राज्याची भानगड घेऊन आह्मांसारख्या यात्रेकरूंना काय करावयाचें आहे?

नागो०—नाहीं नाहीं; बोला तुमचें काय ह्मणणें आहे तें एकूं तरी! आह्मांला मात्र कोणी स्वराज्य पाहिजे

का ह्मणून विचारिलें, तर मी तें नको ह्मणून सांगेन. कारण, संभाजीच्या वेळीं स्वराज्यच होतें ना! परंतु प्रजेला मोंगलांचा कारागृहवास बरा, पण तें यमाजीभास्कराचें स्वराज्य नको अशी स्थिति झाली होती कीं नाहीं, हें तुह्मींच सांगा बरें! अहो, ढेंकूणपिसवा मारणें व मनुष्याचा जीव घेणें हीं दोन्हीं कामें ज्याच्या न्यायशास्त्रांत सारखींच मानिलीं गेलीं होतीं, असले स्वतांचे अविवेकी राजे असण्यापेक्षां परकी काय वाईट? आतां परकी ह्मटले ह्मणजे ते कित्येक प्रसंगीं छळतील, नाडतील, मानहानि करितील हें खरें; पण तसा प्रकार संभाजीच्या वेळीं स्वराज्यांत कोठें नव्हता? त्या सांबापुढल्या नंदीनें बापाच्या मागें मोंगलांशीं विनाकारण द्वेष मांडून आपल्या जन्माचें व्यर्थ मातेरें मात्र करून घेतलें. त्याला एवढें समजलें नाहीं, कीं आपली योग्यता काय आणि आपण द्वेष करतों कोणाशीं!

यात्रे०—( आपल्याशीं ) या सगळ्या गोष्टी माझ्या पथ्यावरच आहेत. तरी या नागोबाला आणखी थोडासा चिडवून फणा हापटावयास लाविलें पाहिजे. ( उघड ) शिव शिव! स्वराज्याविषयींची निंदा ऐकण्याचें माझ्या नशीबीं आलें काय! आणि ती निंदा करणारे तरी कोण? तर प्रत्यक्ष मराठ्यांच्या कुलांत उत्पन्न झालेले सरदार. धिःकार! धिःकार!! अशांच्या घरीं येऊन तोंड वेंगाडण्यापेक्षां थंडीनें मेलों असतों तरी पत्करतें. व्यर्थहो व्यर्थ! स्वराज्याचे असे

उभे वैरी जगांत नांदत असतां संताजीराव घोरपड्या सारख्या धाराशूर मराठ्या सरदारांनीं स्वराज्याचें रक्षण करण्याचे कामीं रात्रंदिवस हाडाचीं काडें करून घेतलीं ह्मणून काय होणार!

नागो०–( रागानें ) कोण आहेरे बाहेर? ह्या भिकारड्या ब्राह्मणाला द्या दोन धक्के आणि लावा हांकून आधीं. अरे, ज्या अधमाचें नांव ऐकलें कीं मी सचैल स्नान करितों, त्या घोरपड्याची आठवण मजपुढें सांगतोस? सेनापति पद देऊन प्रल्हाद पंतांनीं आजपर्यंत मराठ्यांच्या छावणींत त्याचें प्रस्थ माजविलें होतें; पण आतां संभाळ ह्मणावें.

यात्रे०–( कावड खालीं ठेवून ) मानेसाहेब, हा वेळ पर्यंत मी जें आपल्याला टाकून बोललों, त्याबद्दल क्षमा मागतों. मी कोण हें आपण ओळखलें नाहीं. पाहून फार दिवस झालेले, शिवाय हा वेश. तेव्हां ओळख न लागणें साहजीकच आहे. मी हणमंतराव.

नागो०–( निरखून पाहून ) कोण, हणमंतराव! छेः मी तर तुह्मांला अगदींच ओळखलें नाहीं. बहुत दिवसांनीं इकडे कोणीकडे आणि हें असें वेषांतर कां? या, असे बसा.

ह०–( जवळ जाऊन बसतो. ) साहेब, तसेंच कांहीं कारण होतें, ह्मणून हा यात्रेकरूचा वेश घेणें भाग पडलें. मनुष्यस्वभाव नेहमीं चंचल असतो. त्यांतून हे दिवस आले आहेत फारच चमत्कारिक. तेव्हां ह्मटलें, आधीं रंगराव पाहून मग ओळख

घ्यावी; नाहींपेक्षां आलेल्या वाटेनें परत जावें. पण आतां मनाची शंका दूर झाली.

**नागो०**—आपणांस शंका आली हेंच मोठें आश्चर्य! बरें, तें असो; पण हणमंतराव, इकडे येण्याला तुम्हांला सवड कशी मिळाली? कांहीं विशेष कारण असावें.

**हण०**—विशेष कारण आहे, असें नाहीं. जावें ह्मटलें सहज भेटून.

**नागो०**—विशेष नसलें तरी थोडेसें तरी आहेना? मग असा लपंडाव कां?

**हण०**—साहेब, लपंडाव नाहीं; पण एखादी गोष्ट काढली आणि ती आपल्याला रुचली नाहीं, ह्मणजे काढून ही फुकट. ह्मणून भीड वाटते आणि ओंठापर्यंत आलेले शब्द परत जातात.

**नागो०**—हणमंतराव, ओळखीच्या ठिकाणीं अशी भीड कां? खुशाल बोला काय असेल तें.

**हण०**—इतका धीर मिळाल्यावर आतां बोलण्याला हरकत नाहीं. सरदारसाहेब, स्वराज्यांतील नोकरीचा मला खरोखरी अगदीं कंटाळा आला आहे. कारण, आपण मघां ह्मणालां त्या गोष्टीचा मला पूर्ण अनुभव येऊन चुकला असल्यामुळें आपल्या लोकांपासून दोन पावलें दूर असावेंसें वाटतें. जेथें केलेल्या कामाची किंवा बजावलेल्या नोकरीची चीज ह्मणून कशी ती नाहींच, तेथें राहून तरी उपयोग काय? माझा स्वभाव, लष्करी पेशा व इमान कसें आहे हें आपल्याला प्रत्यक्ष जरी नाहीं,

तरी ऐकून माहीत असेल. स्वतांबद्दल फुशारकी मारणें ह्मणजे मूर्खपणाच. पण आपण मला हातीं धरिलें आणि आपल्या वशिल्यानें मोंगल सेनेंत एखादी योग्य नोकरी मिळाली, तर माझ्या आंगीं काय कर्तबगारी आहे, हें आपोआप दिसून येईल.

नागो०—हणमंतराव, तुमच्या येण्यांत असा कांहीं उद्देश असावा, असें मला वाटलेंच. तुह्मीं जें मनांत आणिलें आहे, त्यांत वावगें कांहीं नाहीं. आणखी तसें करावयाचें असा तुमचा पक्का निश्चय झाला असल्यास ही संधि उत्तम आली आहे; पण आधीं पूर्ण विचार करा. आज मोंगलांची नोकरी पत्करिली आणि पुनः उद्यां मराठ्यांकडे आहेच, असें होतां कामा नये. वड वाघुळासारखी कित्येकांची गत असते, ह्मणून सांगतों.

हण०—सरदारसाहेब, दुसऱ्यांचें कसें कां असेना? माझ्यापुरतें मी खात्रीनें सांगतों कीं, मला इकडे नोकरी मिळाली तर स्वराज्याचें यावत्—जन्मांत नांव देखील घेणार नाहीं. बाहेर कोठें तरी खटपट करावी, असा विचार मनांत येऊन आज बरेच दिवस झाले; पण जुळतें कसें? आज तरी इकडे येण्याला सवड झाली ती मी जिंजीस कांहीं सरकारी कामाकरितां गेलों होतों ह्मणून. वेळेवर परत जावयाचें; पण ह्मटलें संधि मिळाली आहे त्यांतल्यात्यांत साधून घ्यावें. मग परत जाण्याला उशीर झाल्याबद्दल बोलून घ्यावें लागलें, तरी पत्करलें.

नागो०—ठीक आहे हणमंतराव. बादशहाची मर्जी संपादण्याची ही वेळ अनायासें आली आहे. कारण,

प्रल्हादपंत निवर्तल्यामुळें आतां धनाजी व संताजी या योद्ध्यांच्या दुकलींत कोणत्याही उपायांनीं फूट पाडून आपला कार्यभाग साधावा, असा बादशहाचा हेतु आहे; व तशा धोरणाचा उद्योगही चालला आहे. तेव्हां, त्या कामीं तुमचें साहाय्य मिळून कामगिरी फत्ते झाल्यास दुधांत साखर पडल्याप्रमाणें होऊन बादशहा खुष होईल. मग नोकरीला काय कमी?

**हण०**—पण त्या कामीं माझा उपयोग कसा व्हावा?

**नागो०**-उपयोग कसा होणार, हें मी तुह्मांला सांगतों. तुह्मी येथून आपल्या छावणींत परत गेलांत, ह्मणजे कोणीही तुह्मांला किल्ल्यावरची खबर विचारणारच; तेव्हां सेनापतिसंबंधानें महाराजांचें मन नीट नाहीं असें किल्ल्यावर लोक बोलतात, एवढें कांहीं मंडळी पाशीं सहज बोलून ठेवा. इतकें झालें, ह्मणजे मग पुढें कसा डाव टाकावयाचा हें मी तुह्मांला सांगेन. पण आतां आधीं तुह्मी दमून आलां आहांत. तेव्हां उठा; जेवणखाण झाल्यावर मागाहून सावकास बोलत बसूं. चला, उठा.

(पडदा पडतो.)

## प्रवेश ४ था.

स्थळ—वेल्होरानजीक मराठ्यांची छावणी.

(धनाजी, सिधोजी व नारोपंत बोलत बसले आहेत.)

**सिधो०**—साहेब, कालचा प्रकार एकंदरींत फार वाईट झाला. मनुष्याच्या हातून चूक होतेच आहे.

पण यःकश्चित् चुकीबद्दल इतकी कडक शिक्षा दिल्यानें पदरचे लोक राजी कसे राहवेत? कोणी तसें नव्हे, असें ह्मणण्याचीही सोय नाहीं. अलीकडे सेनापति संताजी-रावाची प्रकृति इतकी नाजूक कशानें झाली कोण जाणे! हुकुमत चालली पाहिजे हें खरें; पण त्यांतल्यात्यांत कांहीं विचार ह्मणून केला पाहिजे कीं नाहीं?

धना०—अहो, जेथें हुकुमत आणि अम्मल यां-शिवाय तिसरी गोष्टच दिसत नाहीं, तेथें विचार कसला आणि काय कसलें! सेनापति साहेबांच्या अशा ह्या तिखट स्वभावानें व बिकट हुकुमतीनें सैन्यांत बेदिली उत्पन्न होत चालली आहे. परंतु तिकडे पाहणार कोण? दरबारांत मुत्सद्दी किंवा खऱ्या कळकळीचा असा कोणी राहिलाच नाहीं. हुकुमतपन्हा रामचंद्रपंत आ-हेत; पण त्यांचेंच पाठबळ सेनापतींना! तेव्हां त्यांना सेनापतींच्या करण्यांत वावगें कसें दिसणार! मी ह्मणतों हें खरें कीं नाहीं नारोपंत?

नारो०—कोणतीही गोष्ट खरोखरच वावगी अ-सली, तर ती कोणालाही वावगी दिसणारच. रामचंद्र-पंतांना तसा प्रकार दिसला असता, तर ते त्याचा विचार केल्यावांचून राहतेना. कारण त्यांचा स्वभाव अत्यंत निर्भीड आहे. शिवाय महाराजांची हरएक बाबतींत चौकशी असते, हें दुसरें.

धना०—होय, तें खरें. पण हल्लीं शत्रूंच्या हाल-चालीमुळें किल्ल्यावरील मंडळींना किंवा रामचंद्रपंतांना दुसऱ्या कोणत्याच गोष्टीचा विचार करण्याला फुरसत

नाहीं. महाराजांच्या कानापर्यंत तर अशा गोष्टी मुळीं जातही नसतील.

सिधो०—तसें मात्र आतां माझ्यानें ह्मणवत नाहीं. कारण नुकतेच हणमंतराव जिंजीहून आले; ते मला काल भेटले होते. त्यांची व महाराजांची गांठ पडल्यावेळीं या बाबतींत महाराजांच्या तोंडून कांहीं उद्गार निघाले होते, असें त्यांच्या बोलण्यावरून दिसतें. ते आज आपल्याला भेटण्याकरितां येणार होते; पण कां आले नाहींत कांहीं समजत नाहीं. कदाचित् अजूनही येतील.

( हणमंतराव प्रवेश करितो. )

धना०—या हणमंतराव. आतांच तुमची आठवण काढली होती. बसा; जिंजीहून कधीं आलांत तुह्मी ?

हण०—(मोठ्या आदबीनें रामराम करून बसल्यावर ) दोन दिवस झाले मला येऊन. इकडे यावें यावें ह्मटलें; पण फुरसद झाली नाहीं.

धना०—हणमंतराव, किल्ल्यावरील कांहीं कमजास्त वर्तमान ?

हणमं०—विशेष सांगण्यासारखें कांहीं नाहीं. किल्ल्याला शत्रूंचा वेढा पुनः लवकरच पडणार, अशी मात्र बोलवा आहे.

सिधो०—असायचीच. कारण, कामबक्षाच्या परा-

जयामुळें बादशाहा संतापून जाऊन पूर्वीपेक्षां जास्त तयारीनें तो झुल्फिकारखानास पाठविल्यावांचून राहणार नाहीं. तेव्हां आपलीही विशेष तयारी पाहिजे. पण इकडे पाहवें, तों सेनापतींच्या विलक्षण कडक तब्बेतीमुळें आपल्या सैन्यांत दिवसेंदिवस नाउमेदीचाच प्रकार जास्त. हणमंतराव, महाराज या संबंधानें कायसें बोलत होते, असें काल तुह्मी ह्मणत होतां नव्हे?

हण०—होय. पण तें आपलें उगीच.

धना०—उगीच कां असेना; पण काय तें समजल्यास बरें.

हण०—सरकार, दुसरें कांहीं नाहीं. मी तेथें गेल्यावर आजारी पडलों होतों; तेव्हां चांगले बरे झाल्यावांचून परत जाऊं नका, असें महाराज ह्मणाले. त्यावेळीं आपल्या सेनापतिसाहेबांची हुकुमत फार कठीण; राहूं कसा? असें मी बोलून गेलों. त्यावरून महाराज हंसले आणि कायसें ह्मणाले. तेव्हां आपल्या सेनापतींचा असला हा स्वभाव महाराजांना देखील आवडत नसावा, असें दिसतें. शिवाय, त्या अनुमानाला बळकटी आणणारी दुसरी एक गोष्ट आहे. त्यावेळीं महाराजांनीं सरकारच्या गुणांची एक दोन वेळ फार तारीफ केली. मग काय असेल तें असो.

सिधो०—अहो असणार काय? चांगल्याला चांगलें कोणीही ह्मणणारच. महाराजांना आपल्या सेनापतींचा स्वभाव आजच कळला आहे, असें नाहीं. त्यांना पूर्वी-

पासून सर्वांची चांगली पारख आहे. पण प्रल्हादपंत असेपर्यंत केवळ त्यांचा मान राखावा ह्मणून महाराज कांहीं बोलत नसत. नाहींतर हणमंतराव, मी खरोखर सांगतों कीं, महाराजांनीं सेनापति पद कधींच आमच्या सरकारास दिलें असतें.

हण०—मलाही पण तसेंच वाटतें. महाराजांचें मनोगत समजणें जरी कठीण असलें, तरी कांहीं तर्कानें, कांहीं अनुमानधबक्यानें आणि कांहीं जें माझ्या कानावर आलें त्यावरून माझा सूरही तसाच वाहतो. पण ह्या नाजूक गोष्टी बोलाव्या कोणी!

धना०—हणमंतराव, सेनापतिपद मला मिळावें, अशी माझी मुळींच इच्छा नाहीं. कारण, त्यांत विशेष तें काय आहे? आंगचा पराक्रम किंवा स्वामिभक्ति त्यावांचून दाखवितां येत नाहीं कीं काय?

हण०—आपले हे थोरपणाचे विचार पाहून कोणालाही आनंदच वाटणार. पण अधिकाराची गोष्ट ह्मटली, ह्मणजे कांहीं निराळें आहे.

सिधो०—यांत काय संशय! आपले थोरले महाराज कोणताही वरिष्ट अधिकार एकाकडेच फार दिवस किंवा वंशपरंपरा ठेवीत नसत, तें कांहीं उगाच नव्हे. त्यांत त्यांचा खरा धूर्तपणा दिसून येतो. तसें लेकें नाहीं, तर सर्वांना सारखी उमेद येण्याचा प्रसंग कसा मिळावा? नारोपंत, मी ह्मणतों हें खरें कीं नाहीं?

नारो०—होय तें खरें. थोरल्या महाराजांचें धोरण चुकीचें असें कोण ह्मणेल? पण तसें धोरण राखतां

येणें, हें साधारण बुद्धीचें मात्र काम नव्हे. त्याला खरें शहाणपणच लागतें.

**हण०**—वाः ! त्याशिवाय कसें होईल ? बरें; पण बोलण्याच्या नादांत रात्र बरीच झालीशी वाटते. घस्तीच्यापूर्वी मकाणांत गेलें पाहिजे. कारण, आलीकडे विशेष कडक हुकूम सुटूं लागले आहेत.

**सिधो०**—होय, सुमारें १६ घटका रात्रीचा अदमास आला असावा. मलाही गेलें पाहिजे.

**हण०**—सरकार, घेऊं तर आतां निरोप ? चला सिधोजीराव.

**सिधो०**—येतों आतां. परत उद्यां गांठी पडतीलच. ( हणमंतरावाकडे वळून ) फावल्यास हणमंतराव, तुह्मीही या.

**हण०**—ठीक आहे. ( सर्व जातात. )

---

## प्रवेश ५ वा.

( दोघे पहारेकरी प्रवेश करितात. )

**विठोजी**— कोन तान्हबा, तुमचाबी आज पाहरा हाय जनूं ? मी ह्मनालों, तुमी सुटला ह्या तरासांतून एकदांच. तुमची नेमणूक कोनीकडल्या बाजूला झाली या व ?

**तान्हबा**—राव, सुटता कसल आन हाय काय ! दत्ताजीरावाच्या जाग्यावर आलेल्या ह्या नव्या सुभेदाराचा अंमल सुरू होऊनशान दोन दिसबी

झाल न्हाईती. पन भंडावल न काय सांगू सवारीन! त्येन माझी नेमनूक केलीया पिरनवाडीच्या गोटावर.

विठो०—बर तान्हबा, छावनींत ही इकती गडबड उडन्याच कारन तरी काय? हा गोंधळ आन ही अरेरावी कधीं संपनार व?

तान्ह०—कसली संपतीया इकत्या मंधी विठोजीनाईक? अजून काय काय व्हईल, आन काय काय न्हाई! धनसिंगरावांनीं आपल्याला सेनापतिपद मिळाव ह्मनून आपल्या सरकारासंग चुरस मांडल्याचा हा सारा परिनाम, अस ल्वाक बोलत्याती. काय हाय कोनाला ठाव? समद नव राज झालया.

( गोविंदराव प्रवेश करितात. )

विठोजी व तान्हबा—रामराम, रामराम, गोविंदराव दादा.

गोविं०—कोण विठोजीनाईक, बरा भेटलास. पण तूं खांद्यावर बंदूक टाकून पाहऱ्यावर चालला आहेस वाटतें? मी ह्मटलें, माझ्याबरोबर येशील नानासाहेब चव्हाणांच्या तंबूपर्यंत.

विठो०—आपल नव सुभेदार इकत्यामंदी येत्याल हकड. न्हाईतर आचों असतों. आपल्यासारख्यांनीं बोलावल आन आह्मी न्हाई ह्मटल अस कधी तरी झालया व्हय? पन कायव गोविंदरावदादा, आपल सेनापति छावनी सोडून गेल असत्याल तरी कुनीकड! महाराजांना भेटन्यापायीं जिंजीकड गेल असत्याल व्हय? तुमासनी खरी खबर असल कायती.

गोविं०—खरें कोणालाच माहीत नाहीं. पण महाराजांना भेटण्याकरितां ते जिंजीस गेले नाहींत, एवढें मात्र खास. कारण, महाराजांनीं समजून उमजून जर त्यांना अधिकारावरून दूर केलें व सेनापतिपदाचा अधिकार धनशिंगरावास दिला, तर आतां जिंजीस जाऊन तरी काय उपयोग? शिवाय संताजीरावासारख्यांच्या तोंडून 'माझा अधिकार मला मिळावा' अशी दानवाणी कालत्रयींही निघावयाची नाहीं. मानी स्वभावाचीं माणसें तीं!

तान्हा—पन, महाराजांनीं तरी अस करन्याच कारन? आपल्या सेनापति साहेबांची कर्तबगारी कशी च्वाख. लढाईची आग तर पुसूंच नका. अस असूनशान त्येंचा असा अपमान कशापायीं केला बर गोविंदरावदादा?

गोविं०—कशासाठीं आणि काय! दरबारची सगळीच घडी बिघडली आहे. सेनापति संताजीरावासंबंधानें महाराजांचें मन इतकें कलुषित करणारा कोण मायेचा पूत तयार झाला असेल कोण जाणे!! नवे सेनापति धनसिंगराव संताजीरावांना कैद करून जिंजीस पाठविणार अशीही बोलावा आहे. कदाचित् ती अंतस्थ बातमी संताजीरावांना समजल्यामुळेंच ते एकदम छावणी सोडून आपल्या विश्वासु नोकरांसह कोणीकडे तरी निघून गेले असावेत.

विठो०—परवां रात्रीं छावनींत इकता दंगा उडन्याच कारन आपल्या नव्या सेनापतींचा असाच कांहीं ड्योत असल. मला वाटल, शत्रूंचा छापाच आला जनूं! गोष्ट

फार फार बंगाळ झाली. मराठ्यांच्या छावनींत आपापसांत गोळी उडाल्याचा हा पहिलाच परसंग गोविंदरावदादा !

गोविं०—एवढ्यानेंच निभावलें, असें नाहीं विठोजी ! आणखी कोणावर कायकाय किटाळें येतात पहावें. आतां आमच्यासारख्यांनीं छावणींत रहाणें ह्मणजे धोक्याचें आहे. आठ दिवसांपासूनच अशा प्रकारची कांहीं गुणगुण कित्येकांना समजली होती, यांत संशय नाहीं. या आपसांतील दुहीबद्दल धनसिंगरावांच्या पक्षाकडील कित्येक मंडळींना देखील वाईट वाटत आहे. बरें येतों; रामराम. नानासाहेबांनीं मुद्दाम बोलावूं पाठविल्यामुळें तिकडे निघालों आहें. त्यांना कांहीं कमजास्त समजलें असावें. तुह्मी आपलीच मंडळी ह्मणून क्षणभर बोलत उभा राहिलों. नाहींपेक्षां, या नवीन अमदानींत कोणापाशीं बोलायची देखील चोरीच.

विठो०—दीस उफराटे आले, ह्मनजे तस होनारच गोविंदरावदादा ! बर, रामराम. आह्मांलाबी जल्दी गेल पाहिजे पाहऱ्यावर.

तान्हा०— रामराम. आमच मनबी सवस्थ न्हायी. पन करनार काय ? जावा, रामराम. ( जातात )

## प्रवेश ६ वा.

स्थळ— धनाजीरावाचा तंबू

( धनाजीराव एकटेच विचार करीत बसले आहेत. )

**धना०**—( आपल्याशीं ) काय करावें? या हणमंतरावाच्या हल्लींच्या वर्तनाबद्दल मला पावलोंपावलीं संशय येऊं लागला आहे. वयोवृद्ध व ज्ञानवृद्ध असे आपले नारोपंत मला वरचेवर इशारा देत आले. पण, त्यांच्या ह्मणण्याकडे लक्ष न देतां, मी हणमंतरावाच्या नादीं लागल्यामुळें, आज मित्रद्रोहाचें पातक पदरीं घेण्याचा प्रसंग आला. या कपटी हणमंतरावानें आपला मतलब साधण्याकरितां प्रथम महाराजांना भुरळ घालून मला सेनापतिपद देण्याविषयीं त्यांचें मन वळविलें असावें. त्यानें मला आपल्या नादीं लावण्यापूर्वींच जर त्याचा कावा मला समजता, तर गोष्ट या थराला येतीना. पण आतां काय त्याचें! आपलीच बुद्धि गेली, तेथें दुसऱ्याला बोल लावून काय उपयोग?

( नारोपंत प्रवेश करितात )

**धना**—( नारोपंत मुजरा करून बसल्यावर ) नारोपंत, मी तुह्मांला आज या वेळीं कां बोलावूं पाठविलें, हें तुह्मी ताडलें असेलच!

**नारो०**—सरकार आह्मी बुदरूक माणसें. एखादी गोष्ट सांगितल्यावरही ती आह्मांला समजावयाची कठीण; मग न सांगतां कोठचें समजावयाला? दातारपणामुळें

कामाकाजांत एखाद्या गोष्टीचा विसर पडला असल्यास माफी असावी.

धना०—नारोपंत, कोणत्याही कामाकाजांत तुह्मांकडून हयगय झाली, असें आजपर्यंत कधींही घडलेलें नाहीं. कांहीं नाजूक गोष्टींत तुमचा सल्ला विचारावा असें मनाला वाटल्यामुळें तुह्मांला बोलावूं पाठविलें. तो हणमंतराव इतका खोल व कुट्या मनाचा मनुष्य असेल असें आजपर्यंत मला मुळींच वाटलें नव्हतें; ह्मणून मी त्याच्यावर पूर्ण विश्वास टाकिला. पण, त्याच्या वर्तनाबद्दलची तुमची अटकळ पुष्कळ अंशीं खरी, असें आतां माझ्या अनुभवास येत चाललें आहे. कारण, महाराजांकडून सेनापतिपद मला देववावें व संताजीरावाचा मानभंग करावा, या त्याच्या खटपटींत कांहीं कुटिल कारस्थान असावें यांत संशय नाहीं. संताजीराव मराठ्यांची छावणी सोडून निघून गेलेले पाहून हणमंतरावानें मोंगलांकडून त्यांना तिकडे वळविण्याची खटपट चालविली आहे, असें एकतों. तेव्हां हणमंतरावाचें लक्ष खास शत्रूकडे आहे. तर आतां ह्यावेळीं एखादी पोक्त मसलत सुचवाल, ह्मणून तुह्मांस बोलावूं पाठविलें.

नारो०—धनीसाहेब, स्वराज्यासंबंधानें व आपल्या संबंधानें ज्या ज्या बऱ्यावाईट गोष्टी कानावर येतील त्या स्पष्टपणें बोलून दाखविणें, एवढेंच आह्मांसारख्या नोकरांचें काम. त्या कपटी हणमंतरावाचे खावयाचे दांत निराळे व दाखवावयाचे निराळे, हे मी धनीसा-

हेबांच्या कानींकपाळीं ओरडून दमलों पण, त्याचा व्हावा तसा उपयोग झाला नाहीं, हें [illegible] दुर्दैव तेथें कोण काय करणार !

धना०—होय, तें सारें झालें; पण आतां पुढचा विचार कसा ? संताजीरावासारखा मोहरा जर आज शत्रूंच्या पक्षास मिळाला, तर हा वेळपर्यंत मिळविलेल्या यशाच्या व स्वराज्याच्या नाशास मीच कारण झालों, असें अपयश माझ्या माथीं येणार. तर तें न येईल असा कांहीं उपाय असल्यास, तो लवकर केला पाहिजे.

नारो०—धनीसाहेब, त्याला एक उपाय आहे, असें माझ्या बुद्धीस वाटतें. पण, तो व्हावा कसा ? कारण, तो कपटपटू हणमंतराव कोणत्या वेळीं काय गौडबंगाल करील, हें समजावयाचें देखील नाहीं. तेव्हां त्याचा आधीं बंदोबस्त झाला पाहिजे. मग, संताजीरावांना परत आपल्या छावणींत आणण्याकरितां जे आपले लोक त्यांचा तलास करीत फिरताहेत, त्यांस परत बोलवावें, ह्मणजे निम्मेशिम्मे कार्य होईल.

धना०—तें कसें ?

नारो०—आपले लोक त्यांचा तलास करीत हिंडताहेत असें संताजीरावांना समजलें, ह्मणजे त्यांच्या मनांत भलताच संशय येण्याचा संभव आहे. कारण, त्यांना परत छावणींत आणण्यामध्यें आपला किंवा महाराजांचा दुष्ट हेतु नाहीं हें जरी खरें आहे, तरी एकवार पोळलेल्या मनाला तसें वाटावयाचेंच. तेव्हां आपण त्यांचा मुळींच

नाद सोडून दिला ह्मणजे त्यांची तितकी भीति कमी होईल. मग शत्रूंनीं किती जरी खटपट केली, तरी ज्यांनीं आजपर्यंत सर्व आयुष्य स्वराज्यसेवेंत घालविलें आहे, ते शत्रूस मिळून आपणच वाढविलेल्या राज्यरूपी वृक्षावर कुठारीचा घाव घालण्यास तयार होतील, असें मुळींच संभवत नाहीं. संताजीराव हे मोठे मानी स्वभावाचे आहेत, व मानी स्वभावाचीं माणसें नेहमीं निष्कपटी व सरळ असतात.

धना०—होय; नारोपंत, तुमची ही मसलत यावेळीं अगदीं योग्य आहे. आपल्या लोकांना परत आणण्याची तजवीज करणें, हेंच या प्रसंगीं बरें दिसतें; अशा उपायानें संताजीराव शत्रूस वश होणार नाहींत, असें मलाही वाटतें. नारोपंत, आज दोन तीन दिवस माझें मन याच विवंचनेंत असल्यामुळें मला झोंप देखील आली नाहीं.

नारो०—सरकार, यांत विवंचना करण्याचें कांहींच कारण नाहीं. आह्मी त्यांचा नाद सोडिला आहे अशी त्यांच्या दिलाची पुरी खात्री मात्र झाली पाहिजे, ह्मणजे ते शत्रूंची विनंति कधींही मान्य करणार नाहींत. व हीच गोष्ट आह्मांला प्रथम पाहिजे आहे. ती झाली ह्मणजे पुढचा विचार. संताजीरावासारखा दिलदार सेनानायक जरी कांहीं गैर समजामुळें बेदिल झाला, तथापि स्वामीच्या इच्छेविरुद्ध पाऊल टाकण्यास तो कदापि तयार होणार नाहीं. मग तशा समंजस पुरुषाचें

मन वळविण्यास फारसे प्रयास नकोत. आतां काय त
त्या विश्वासघातकी हणमंतरावाचीच भीति.

धना०—नारोपंत, आपला कार्यभाग होईपर्यंत त
हणमंतरावाला असेंच नादांत ठेवणें शहाणपणाचें आहे
नाहींतर, तो एकदां बिचकला व आपल्या कारस्थानाच
दुसऱ्यास वास आला आहे असें त्याला वाटलें, त
सर्वच मसलत बिघडेल. ह्मणून पूर्वीच्या धोरणाप्रमाणें
त्याच्याशीं आणखी कांहीं दिवस वागलें पाहिजे
तुह्मीं मात्र त्याच्या वर्तनावर पूर्ण लक्ष ठेवून त्याच्य
हालचालींबद्दल मला इषारा देत जा ह्मणजे झालें.

नारो०—सरकार, त्या विश्वासघातकी हणमंतरावानें
आपल्यास महत्वाकांक्षेच्या नादीं लावून काय का
डावपेंच मांडिले आहेत, हें आज नाहीं उद्यां सर्व
उजेडास येईलच. परंतु त्याच्या वर्तनाबद्दल आपल्या
दिलाची लवकर खात्री झाली, हें चांगलें झालें; नाहीं
पेक्षां कसा प्रसंग आला असता कोण जाणें!

धना०—ठीक आहे. नारोपंत तुह्मी आतां जा. रात्र
बरीच झाली; उद्ईक सर्व कांहीं व्यवस्था जरूर केली
पाहिजे.

नारो०—बरें; येतों तर आतां. (रामराम करून
जातात.)

अंक पहिला समाप्त.

# अंक २ रा.

## प्रवेश १ ला.

स्थळ—कर्नाटकांतील जंगल.

( संताजी, पिलाजी व येसबा किडबिड जोशाच्या वेशानें प्रवेश करितात. )

**पिलाजी**—महाराज, योक गोष्ट बोलावी ह्मनतो; पन धनीसाब रागावत्याल. ह्ये अस वेस पालटूनशानी किती रोज तरी भटकाव बगा! आपून तर अक्शी कटाळलोया. या परास त्या खानाच ऐकाव, अस माज्या ध्येनामंदी येतया.

**संताजी**—पिलाजी, तूं ह्मणतोस त्याप्रमाणें माझाही जीव त्रासतो खरा; पण काय करणार? प्रसंग येईल तसें मनुष्यानें वागलें पाहिजे. काळ बदलला ह्मणून आह्मीं आपलें कर्तव्य विसरतां कामा नये. विपत्ति भोगावी लागली, तरी आणखी कांहीं दिवस असेच काढिले पाहिजेत.

**येसबा**—सरकार आमच कसबी व्हईल. पन आपल्यासनी ह्यो तरास आन वेनवास कसा सोसनार? मलातर रातदीस ह्योच ध्यास लागल्यापायीं अन्नबी ग्वाड लागना, अन झापबी येईना इच्या मन. तंवा ग्वांगलाची सरदारी पत्करन्यान ही जिवाची तळमळ तरी चुकल ह्मणतो.

संता०—येसबा, तसें केल्यानें जिवाची तळमळ कमी तर व्हावयाची नाहींच. पण विचार न करितां अयोग्य मार्गाचें अवलंबन करून सुखी होण्याचा यत्न केला, तर तीं सुखें अंतःकरणास सदोदित सुईच्या अग्रासारखीं टोंचत राहतील. अशा रीतीनें मिळालेलीं सुखें पाहणारास मात्र गोड; पण त्यांचा उपभोग घेणाराला तीं विषापेक्षांही कडू लागतात. आज चार दिवस हाल काढावे लागले तरी ही वेळ निघून जाईल; परंतु धीर सोडून मोंगलांची सेवा पत्करण्याचा भलता विचार मनांत आणिल्यास आपल्याला जग काय बरें ह्मणेल? प्रसंग कांहीं राहत नाहीं; मनुष्याची कृति मात्र नेहमीं कायम राहते. तर यःकश्चित् संकटास त्रासून कर्तव्यास अंचवावयाचें कीं काय!

पिला०—पन सरकार, ज्येच्यापायीं आपुन आपल्या हाडाचीं काड केलीं, रातबी ह्मटली न्हाई दिसबी ह्मटला न्हाई अक्शी शीर हातावर घेऊनशान इक्तीं कामगारी बजावली त्योच धनी जर बेमान झाला, आन वंगाळ लोकांसंग खलबत करून भ्भमलत कराया लागला, तर आपनाकड तरी काय दोस? जत आपलच कुनी न्हव तत समद राज गेल काय आन न्वाडगा मातला काय, सारखच!

संता०—पिलाजी, आजवर प्राणापेक्षांही प्रिय मानून ज्या प्रभूची खऱ्या अंतःकरणानें सेवा केली, त्याची आपल्यावर इतराजी झाली ह्मणून त्याजवर हत्यार धरण्यास तयार होणें, यासारखा अधमपणा दुसरा

कोणताच नाहीं. आज आपण शत्रूंची सेवा पत्करण्यास तयार झालों, तर मोंगल बादशाहा आपल्यास पदरीं ठेवून घेऊन आपले हवे ते जयजयकार करील हें खरें; पण ज्यांना आजपर्यंत आपण आपले हाडवैरी मानून त्यांच्या रक्तानें अनेक वेळ तलवारी माखिल्या व ज्यांच्या कुळाचें आणि धर्माचें फड्या निवडुंगाप्रमाणें पसरत चाललेलें दुष्ट बीं या भरतभूमींत मुळींच ठेवावयाचें नाहीं अशा निश्चयानें जीव आटविला, त्या मोंगल शत्रूंचा सहवास, पिलाजी, आपल्यास कसा बरें सुखावह होईल?

येस०—धनीसाब, ह्ये समद खर. पन ज्यांनीं आपल्यावर हा परसंग आनला त्येची खवाड मोडन्यापायीं शत्रूची चाकरी तिकल्या पुरती केली म्हून काय झाल? आपल जातभाई असल, अन त्येनी आपल्या संग दुस्मानगिरी मांडली, तर त्येच परापत नग कराया व्हय?

संता०—होय पारिपत्य केलें पाहिजे. पण तें करण्याचे अन्य मार्ग आहेत. घरांत साप शिरला ह्मणून घराला आग लाविली तर सापाबरोबर सबंध इमारतीचाही नाश होतो, याकडे लक्ष दिलें पाहिजे. ( अस्तनींतील तलवार बाहेर काढून ) येसबा, ही तलवार निर्जीव खरी; परंतु जिला आजपर्यंत लडिवाळपणें हातीं वागविलें आणि स्वदेश व स्वधर्म यांच्या रक्षणार्थ रणभूमीवर शत्रूंच्या रक्तपातानें जिला नित्य तृप्त केलें, ती स्वकीयांच्या नाशार्थ उगारण्यास मी आज उद्युक्त झालों, तर खचीत हातची गळून पडल्यावांचून राहणार

नाहीं. मग ज्याला परमेश्वरानें बुद्धि व वाचा हीं दिलीं आहेत, अशा मनुष्यानें स्वराज्यनिष्ठेला झुगारून देऊन आपल्या सुखासाठीं अधमपणाची कृति करण्यास कसें बरें तयार व्हावें? यासारखी शरमेची गोष्ट दुसरी कोणतीच नाहीं. एकदां मोंगलासारख्या फारा दिवसांच्या कट्या शत्रूनें पुरें शासन झालें, म्हणजे मग आपसांतील दुस्मानगिरी पाहतां येईल.

पिला० व येस०—धनीसाब, हामी किती झालों तरी पायाच चाकूर. हामासनी इकता पोक्ता इचार आन प्याच कुटला आलाया? अक्शी अस्मान कोसळल असूनशानीबी ही आपली हिंमत. मग हामी म्याडावानी कां बोलाव! तंवा आतां परान गेला तरीबी ह्योच निच्छव कीं, 'न्वाडग्यांची चाकरी' हे शबद फिरून न्हाइ काडनार तोंडावाट. अपून जे वरत धरल्या त्येच ठ्यास. जत आपल पाय तत आमची डुई.

संता०—पिलाजी, तुह्मीं उभयतांही एकानिष्ट सेवक आहांत. तुमचा विश्वासूपणा मी अनेकवेळ कसोटीस लावून पाहिला आहे. ह्मणून तुह्मीं एखादे वेळीं असमंजसपणें अप्रिय जरी बोललांत, तरी त्याचा मला मुळींच विषाद वाटत नाहीं. कारण, हीच वेळ आपल्या खऱ्या परीक्षेची आहे. अशा दुर्धर प्रसंगींही आपल्या कुळांस बट्टा लावून न घेतां जे धैर्यानें वागतील, तेच इहपरलोकीं धन्य होतील. अल्पलाभासाठीं स्वाभिमान व आपलें कर्तव्य विसरून जाऊन स्वतांचा देह परक्यास विकणारे नरपशु आपल्या भरतभूमींत बरेच निर्माण

झाल्यामुळें आह्मांस अनेक दुःखें भोगावीं लागत आहेत. तशा अधमांचा नामोच्चार करणेंही महापातक असें जर आह्मी मानितों, तर एखाद्याचा सूड उगविण्याच्या आवेशांत आपलेपणास विसरून एकंदर महाराष्ट्रीयांच्या सौख्यांत विष कालविण्यास हा घोरपड्यांचा वंश कसा बरें तयार होईल!!

पिला०—हे काय बोलाव धनीसाब! आपुन किती झाल तरीबी पिढीजाद सरदार! तंवा आपल्ल ह्ये दिलदार इचार आन थोरपणाला साजल अस वागन कोन बर न्हव ह्मनल!! पन आतां होर कस काय करनार?

संता०—पिलाजी, सांगतों ऐक. आह्मी आज आपल्या खऱ्या कर्तव्यावर नजर देऊन मरण्यास तयार झालों, तर ईश्वर आपलें खचीत साहाय्य करील. यापुढें स्वतंत्रपणें आपल्या पुण्यप्रताप शिवरायाचें यश दिगंत फडकविण्यासाठीं मोंगलाशीं टक्कर देण्याचें मी मनांत योजिलें आहे, समजलास?

येस.—पन सरकार, आतां आपल्या हातून सवराजाची चाकरी व्हनार कशी? आपल्यासंग ना फौज ना फांटा. आपल धाकट नानासाब साताऱ्याकड गेल्याती, त्येंचा ठिकानाबी न्हाई अजून. दत्तारावासनी सरकारानी कुनीकड लाऊन दिलया, त्येबी तकडच. तवा हामी अशा जंगलांत राहुनशान शत्रूंशीं टक्कर घेनार कशी?

संता०—येसबा, आह्मांला कोणाचें तरी साहाय्य मिळून उघडपणें आह्मीं स्वराज्याचा झेंडा उभारल्यावांचून

शत्रूंचें पारपत्य आमच्या हातून होणार नाहीं, हें मी जाणून आहें. नानासाहेब साताऱ्याहून आले ह्मणजे रामचंद्रपंतांचा विचार ऐकून घेऊन काय ती मसलत करावयाची. तोंपर्यंत असेच अज्ञातवासांत दिवस कंठूं. दत्ताजी वांकीनखेड्यास गेला आहे. तेथील पाळेगार व बेरडांचा नायक पुन्नाजी याला माझा निरोप व हेतु समजला, ह्मणजे तो आपल्या हाताखालच्या एकंदर लोकांसह येऊन मला मिळेल. अशा रीतीनें थोडीशी मदत मिळाली, कीं आपण काय पाहिजे तें करण्यास समर्थ होऊं. एकदां मराठ्यांचें निराळें निशाण फडकवून आह्मी शत्रूंस शह दिला ह्मणजे कित्येक कामें आपो- आप होतील. बरें; आतां उन्हाची तिरीप तर फार लागूं लागली आहे. तेव्हां या जवळच्या खेड्यांत जाऊन आज तेथेंच वस्ती करावी.

**पिला॰ व येस॰**—सरकारचा जसा इचार व्हइल तस.

**संता॰**—बरेंतर; चला. ( जातात. )

---

## प्रवेश २ रा.

**स्थळ**—साताऱ्यांतील साबाजीरावाचा वाडा.

( वृंदा एकटीच दिवाणखान्यांत बसली आहे. )

**वृंदा**–( आपल्याशीं ) एका क्षणापूर्वी मी झोंपेंत असताना किती तरी आनंदांत होतें. पण जागी होतांच हा दिवाणखाना मला शून्य भासूं लागला. अहाहा!

किती तरी गोड भाषण! त्या मदनालाही लाजविणाऱ्या प्रिय पुरुषाचं समागमसुख माझ्या कपाळीं ब्रह्मदेवानं लिहिलं आहे काय? लिहिलं असलं, तर माझं स्वप्न आज नाहीं उद्यां केव्हां तरी खरं होईल. पण त्या गिरिजेचं काय कौटाळ आहे कांहीं समजत नाहीं. तिनं सांगितल्याप्रमाणं जर सर्व गोष्टी खऱ्या असल्या, तर खरोखरच माझ्या नशीबाला जोड नाहीं. ती अंबिका बाबांच्या मनांत शिरली असली, तर माझे सर्व मनोरथ लवकरच सिद्धीस जातील. पण गिरिजेनं जर माझ्या मनाची समजूत करण्याकरितां उगीच कांहीं सांगितलं असलं, तर मात्र 'डोंगरचे आवळे आणि समुद्रांतलं मीठ' अशा माझ्या ह्या मनोराज्याचा परिणाम काय होईल कोण जाणें! (उसासा टाकून) कांहीं झालं, तरी जी श्यामसुंदर मूर्ति मीं या हृदयमंदिरांत सांठविली आहे, त्यावांचून दुसऱ्याला हा देह अर्पण करावयाचा नाहीं, हें खास. अहाहा! किती तरी तें मनोहर रूप! आणि मुखश्रीवरील तेज तर मदनाच्या तेजालाही खचित मागं सारील. सगळं खरं; पण बाई माझ्याठायीं उत्पन्न झालेल्या ह्या प्रेमांकुराला त्या उदार अंतःकरणांत जागा मिळाली असेल का! मजसारख्या शेंकडों दासी त्या पायांची सेवा करण्यास तयार असतील. मग मलाच त्या कल्पवृक्षाचा लाभ कसा व्हावा? माझ्या मनाला तर सकाळसंध्याकाळ, दिवसांरात्रीं, अष्टौप्रहर त्या सुंदरमूर्तीच्या ध्यानावांचून दुसरा विषयच नाहींसा झाला आहे.

( गिरिजा दासी प्रवेश करते. )

गिरिजा—( आपल्याशीं ) तरी ह्मटलं, ताईसाब इकती वाडोळ झोंप कुठली आलीया! कवाबी ब कुनी नहींसं बगून हातावर डोकस ठेवून अक्शी सलेल्या असत्याती. मग इकता इचार कसला करत्या कुणाला दक्कल? ( उघड ) ताईसाब, अशा एक बमूनशान कसला इकता इचार चाललाया? मला गाकीं जी वांइच.

वृंदा—आली कीं नाहीं चावट कुठली! विचार ग सला करतात! विचार करायला संसार माझ्या लागला आहे थोडाच?

गिरिजा—अव ताईसाब, जतल्या बोरी तत्स्स बावळी! ह्ये ढंग माज्याम्होर न्हाइ लपायच. सां का पन? त्ये त्ये कर्नाटकच सरदार आपल्या घरीं वन आल्यापुन तुमचं चित्त ध्येनावर न्हाई बगा. ख पिन, ऱ्येन, घेन, काइबी तुमासनी ग्वाड लागनासं झा

वृंदा—गिरिजे, भलतं सलतं कांहीं बोलशील नाहीं, तर माझ्या नाहींहो कामावर पडायचं! ल ली जीभ लावली टाळ्याला! चावटळ कुठली. थ चून भाषण कसलं तें मेलीला माहीतच नाहीं!

गिरि०—आपुन आज काईबी ह्मटलं, तरी ह ध्येनच माग. पन जरका उद्यां मनापरमान स गोष्टी जमूनशान आल्या, तर मात्र मग ह्या गिर आटवण बी व्हाई र्‍हनार ताईसाब! कालच न्ह

त्या किल्लेदारांच्या घरीं मी गेलें होतें; तत ह्याच गोष्टी निगाल्या व्हत्या. ते कर्नाटकच पावन लई थ्वार घरा-न्यांतलं हायती. सेनापति संताजीराव घोरपड्यांच त्ये ल्योक. त्यॅच नांव राणोजिराव; पन त्यांसनी नानासाब ह्मनत्याती. त्यॅच गुन आन पराकरम वडिलांपरास एक कांकणभर सरसच.

**वृंदा**—असतील; पण तुला हें विचारलं कोणी? गिरिजे, तुला कीं नाहीं नसत्या उठाठेवी फार पाहिजेत. माझं तर बाई कालपासून कपाळ दुखूं लागलं आहे. सारी रात्र झोंप आली नाहीं ह्मणून क्षणभर निजणार होतें; पण तूं कुठली झोंप लागूं द्यायला?

**गिरि०**—ताईसाब, ह्यो निजायाचा का वकत? संध्याकाळ झाली न्हवका! चलाकीं बागमंदी जरास हकड तकड फिरूनशान येऊं. ह्मंजे जिवाळाची वाईच बर वाटल आन डोईची दुखायची न्हाईल. आपल्या त्या जाईच्या येलाला अगदींच किव इसरून गेलांत ताईसाब!

**वृंदा**—गिरिजे, बरी बाई आठवण केलीस. आली-कडे बघ मला बागेकडे जायला झालंच नाहीं अगदीं. तूं तरी त्या बाबांनीं लावलेल्या जाईला नित्य पाणी घालतेस नाग? तिला नुकत्या कळ्या येऊं लागल्या आहेत नव्हे का?

**गिरि०**—व्हय; चला आपल्यासनी दावतें ताईसाब.

( आपल्याशीं ) त्या कर्नाटकच्या पावन्याझोर कुठली आलीया जाई आणि कुठली गिरिजा!

( दोघी जातात. )

## प्रवेश ३ रा.

स्थळ—धनाजीचा तंबू.

(धनाजीराव एकटेच बसले असतां हणमंतराव प्रवेश करितो.)

हण०—( आपल्याशीं ) आतां वाटेंत भेटलेली स्वारी इकडूनच गेली असावीशी वाटते. या नारोपंतानें खरोखरच भंडावलें बुवा! माझ्या कामाला हा राहू लागल्यासारखा लागला आहे. कांहींतरी विषाचे थेंब ओकून गेला असेलच. पण, ( मिशावर ताव देऊन ) या हणमंतरावाशीं गांठ आहे समजलास बच्चाजी! ( धनाजीरावाकडे पाहून आदबीनें मुजरा करितो आणि बसतो ) काय, आज सरकारची स्वारी सकाळींच कोठें शिकारीस गेली होती वाटतें.? परत येण्याला अगदीं संध्याकाळ झाली; तेव्हां स्वारी बरीच दूर गेली असावी.

धना०—होय; आजचा पल्ला बराच दूरचा होता. पण, हणमंतराव, आज कीं नाहीं मोठ्या शर्तीनें पार पडलों. वाघाची शिकार सांपडेल ह्मणून जो एका जंगल हुसकणाऱ्याच्या नादीं लागून डोंगराच्या दरींत शिरलों, तों सांपडलों कचाट्यांत! कडा तुटलेली वाट;

शिवाय एका भयंकर उभ्या शिळेला बुजून घोडा बिचकला, तो कांहीं केल्या आवरेना. मग काय विचारतां!

हण०—तरी ह्मटलें, शिकारीहून परत येण्याला इतका उशीर लागूं नये! मांडीखालचें जनावर एखाद्या वेळीं बिचकलें, ह्मणजे मोठी पंचाईत उडते खरी. आपल्या सारख्यांची गोष्ट निराळी. पण, आह्मांसारख्यांच्या तोंडचें तशा वेळीं पाणीच पळावयाचें! बरें; या एक दोन दिवसांत संताजी संबंधानें कांहीं कमजास्त बातमी?

धना०—हणमंतराव, अद्याप कांहीं सुगावा नाहीं. इतके दिवस आपले लोक त्याच्या शोधार्थ फिरत असतां त्यांना संताजीचा अद्याप कसा थांग लागत नाहीं, याचें मला मोठें आश्चर्य वाटतें. एकदां असें मनांत येतें कीं इतःपर त्याचा नादच सोडून द्यावा. कारण, तो एकटा जिवंत असून नसून सारखाच. त्याला आतां या जगांत साहाय्य करणारा मित्र ह्मणून कोणी उरला नाहीं. सर्व लोक त्याला सोडून गेले आहेत. तेव्हां तो कितीही पराक्रमी असला, तरी त्याच्या एकट्याच्या हातून आतां स्वराज्याचें वांकडें तें काय होणार? पण पुनः आणखी विचार येतो.

हण०—छेः भलतेंच! अशी कल्पना मनांत आणून विस्तवाची ठिणगी अस्तनींत बाळगणं केव्हांही शहाणपणाचें होणार नाहीं. ह्मणतात ना, अगोदर सर्पाला दुखवूं नये आणि एकदां जर जाणूनबुजून त्याच्या

शेंपडीवर पाय दिला, तर मग त्याला जिवंत सोडणें ह्मणजे मृत्यूला आपण होऊन आमंत्रण देणें होय. कारण, तो केव्हां घात करील याचा नेम लागावयाचा नाहीं. संताजीनें गुप्त कारस्थानें चालवून काय काय करावयाचें योजिलें आहे, हें अद्याप आपल्या कानावर आलें नाहीं; ह्मणून कदाचित् आपल्याला तसें वाटलें असेल.

**धना०**—हणमंतराव, संताजी आतां गुप्त कारस्थानें तीं कसलीं करणार? दांत आणि नखें काढून टाकिलेल्या वाघाप्रमाणें त्याची अवस्था झाली आहे. रानांतील कंदमुळें खाऊन त्यानें आतां दऱ्याखोऱ्यांत कोठें तरी लपूनछपून आयुष्याचे दिवस काढावे, इतकेंच.

**हण०**—सरकारानें असें ह्मटल्यावर उपाय नाहीं. पण जगांत मनुष्यें फसतात तीं अशानेंच. शरीरांत रोगानें प्रवेश केल्यावर त्याकडे दुर्लक्ष करून तो वाढूं देणें केव्हांही हिताचें होत नाहीं. संताजीचा कावा सरकाराला अद्याप पुरसा समजून आला नाहीं. (हात जोडून) स्पष्ट बोलल्याबद्दल सेवकाला माफी असावी. त्या आपल्या वैऱ्यानें गुप्तपणें विजापूरकरांच्या पदरचे पूर्वीचे पाळेगार एकत्र जमविण्याचा उद्योग चालवून जाधवकुळीचा थोडक्याच दिवसांत नायनाट न केल्यास घोरपड्यांचीं बेचाळीस कुळें नरकीं घालीन, अशी उग्र प्रतिज्ञा केली आहे. तेव्हां अशा अधमाला देहांत प्रायश्चित देण्याचा होता

होईल तों जरूर इलाज केला पाहिजे. क्षणाचाही विलंब उपयोगाचा नाहीं.

धना०-हणमंतराव, तुह्मांला लागलेली ही बातमी कितपत खरी आहे, हें सांगवत नाहीं. पण जरी ती खरी असली, तरी मनुष्य वैतागला ह्मणजे जसें काय हवें तें बरळतो, त्याप्रमाणेंच संताजीची ती प्रतिज्ञा. कावळ्याच्या शापानें अशीं गुरें मरूं लागलीं असतीं, तर दुनिया ओस पडती. शिवाय, अशी भीष्मप्रतिज्ञा करणारीं माणसें जगांत असलेलीं बरीं.

हण०-( आपल्याशीं ) हे शब्द मराठ्याच्या तोंडून निघताहेत खरे; पण यांत मानव्याचा मेळ आहे यांत शंका नाहीं. त्या थेरड्याचें कारस्थान ह्मणजे त्रैलोक्य चिंतामणीच्या मात्रेचा वळसा. तेव्हां तो कोणाकडून काय न वदवील! आतां येथें फार वेळ बोलत बसण्यांत फारसा अर्थ नाहीं. ( उघड ) होय, आपण ह्मणतां तेंही खरें. आपली योग्यता काय व आपण प्रतिज्ञा करितों काय, ह्याचा विचार न करितां कांहीं तरी बरळणें ह्मणजे तोंडाची वाफ घालविण्या पलीकडे कांहीं नाहीं, असेंच समजावयाचें. भुंकणारा कुत्रा सहसा चावत नाहीं अशी ह्मण आहे. तेव्हां घाई तरी कां करा? बरें; मला आज सोमप्रदोष आहे. वेळ झालीच ह्मणावयाची. निरोप असल्यास....

धना०-ठीक आहे हणमंतराव. पाहूं काय काय होतें तें. सर्व कांहीं धीरेंधीरें घेतलें पाहिजे. तुह्मी जा आतां. ( रामराम करून निघून जातो )

# प्रवेश ४ था.

( हणमंतराव प्रवेश करितो. )

हण०–( वाटेंत आपल्याशीं ) तरी मी तेव्हांच ताडिलें, कीं कांहीं पाणी मुरलें आहे! त्या थेरड्या नारोपंतानें जादूची कांडी फिरविली यांत शंका नाहीं. एरव्हीं धनाजीरावाला मी महत्वाकांक्षेच्या नादीं लाविल्यापासून त्यांच्या तोंडून असे उडवाउडवीचें भाषण कधींच निघालें नव्हतें. कारण तरी काय असावें बरें! 'अशी भीष्मप्रतिज्ञा करणारीं माणसें जिवंत असलेलीं बरीं' हें वाक्य त्यांच्या तोंडून चटकन् सहज निघून गेलें आणि मग स्वारीनें जीभ चावली. माझ्या कृष्णकारस्थानाबद्दल त्या थेरड्यानें आपल्या धन्याच्या मनांत कांहीं कुकल्पना तर भरवून दिल्या नसतील ना? छे:! तसें होणें शक्य नाहीं. पण नाहीं ह्मणावें, तर 'वाघाच्या शिकारीच्या नादीं लागून कचाट्यात सांपडलों' या धनाजीरावाच्या भाषणांत कांहीं तरी खोंच आहे खास. काय आहे ईश्वर जाणें! इतःपर फारसें कोणाच्या विश्वासावर जातां कामा नये, एवढीच गोष्ट. सावधगिरीनें वागून आतां लवकरच मराठ्याच्या छावणीला रामराम ठोकावा. हें आपल्या कामाला मध्यें मोठेंच विघ्न आलें ह्मणावयाचें! ( किंचित् विचार केलासें करून ) अं:! असल्या विघ्नाला हणमंतराव जुमानतो आहे थोडाच. एक मसलत फसली तर दुसऱ्याला तोंडघशीं पाडणाऱ्या शेंकडों हुकुमबाज मसलती माझ्यापाशीं तयार आहेत. शिवाय, गुळदुस्त्यांतल्या

त्या निराळ्याच! धनाजीरावानें संताजीचा नाद सोडिला, तरी तो या हणमंतरावाच्या तावडींतून कसा सुटतो, तें पाहीन. तो संताजीचा पोर नानासाहेब साताऱ्यास रामचंद्रपंतापाशीं कांहीं खटपट करण्याकरितां गेला आहे, असें ऐकतों. तर, त्याची व संताजीची परत भेटच न होईल अशी व्यवस्था करण्याकरिता मला आधीं बादशहाच्या छावणींत गेलें पाहिजे. संताजी जातो कोठें! त्यानें नागोजीरावांच्या भावास हत्तीचे पायीं देवविलें असल्यामुळें तो दंश त्यांच्या मनांतून कधींही जाणार नाहीं. तेव्हां नागोजीरावांच्या हातून संताजीचें पारिपत्य करवीन, तेव्हां या हणमंतरावाचे डोळे थंड होतील. नागोजीरावांची बायको राधाबाई ही अमृतराव निंबाळकरांची मुलगी. घोरपड्यांचें व निंबाळकरांचें पूर्वीपासून वांकडे. त्याअर्थी तिकडूनही पाहिजे असल्यास खटपट करितां येईल. अशा जोडगोळी असल्यावर शिकार हटकून साधलीच पाहिजे. चला तर; शुभस्य शिघ्र!

---

# प्रवेश ५ वा.

---

स्थळ—साबाजीरावाच्या घरामागील बगीचा.

( वृंदा व गिरिजा प्रवेश करितात. )

**गिरिजा**—ताईसाब, ह्या पिंवळ्या शेवतीच्या ताटव्याकड बगा वाईच! अरर! ह्येची कुनीबर इकती नासाडी केलीया? हं, आलं आतां ध्येनांत. काल त्या खासनीसांच्या घरीं मंगळागवर व्हती नव्हका?

त्यांच्या मुली हत फुलं न्येया आल्यात्या. त्येचच ह्ये काम, ताईसाब !

वृंदा–त्यांना झाडाजवळ येऊं न देतां तूंच फुलं काढून द्यायची होतीस. तसं कां बरं केलं नाहींस? त्या किति झाल्या तरी लहान मुली. त्यांना काय समजतं? मंगळागौर मोठी व्हावी एवढीच त्यांची हौस.

गिरि०–द्वाड पोरींची ही कसलीव हौस? फुलं न्येया सांगितलं ह्मुन अशी नासाडी करन कंची रीतजी! ताईसाब, त्ये कर्नाटकच सरदार आपल्या घरीं आल्याती न्हव, त्येबी बागमंदी फिराया आल्याती जनु! आपुन जरा पल्याड जाऊं चला.

वृं०–( इतक्यांत नानासाहेब बागेंत आलेले पाहून चपापते ) गिरिजे, आज विनायकी नव्हे काग? बरी बाई आठवण झाली. बाबांकरितां दुर्वा आणि फुलं काढून नेलीं पाहिजेत. थांब, ह्या इथच चांगल्या दुर्वा दिसताहेत ( दुर्वा तोडूं लागते )

गिरि०–व्हय व्हय ताईसाब; मलाबी याद नव्हती बगा! पन त्ये आपल पावन हकडच आल किव! तंवा आपुन ह्यो जागा सोडून तकड दूर जान चांगल. तकडबी लइ ब्येस दुर्वा हायती.

वृं०–अग, ते इकडे फिरत आले, तरी आपल्याकड कशाला बघणार आहेत.? मी तर बाई आतां फुलं दुर्वा काढल्यावांचून कुठं नाहीं यायची. संध्याकाळ नाहीं का झाली?

गिरि०—व्हय; त्येबी खरच ताईसाब. आपून हतच असा. मी आमंदी जाऊनशान फुलांची पर्डी घेऊन अश्शी आलेच बगा. ( निघून जाते )

नानासाहेब—अहाहा! किति मजेशीर तरी वेळ ही! या वेळीं बागेंत फिरणें खरोखरच आनंददायक होय. त्यांतून सगळया गोष्टी मनाजोग्या जमल्या, ह्मणजे मग तर त्या आल्हादाला पारावारच नाहीं. हा सायंकाळचा समय असल्यामुळें शीतळ वायूबरोबर येणारा अनेक पुष्पांचा सुवास माझ्या उद्वेग पावलेल्या मनाला सुखविण्याकरितां सारखा झटत आहे. साबाजी-राव शितोळे स्वतां सुशिल आहेत; तेव्हां त्यांच्या नित्त्या-च्या सहवासानें त्यांच्या घरचीं चाकरमाणसेंही दुसऱ्यांचें आदरातिथ्य करण्याचे कामीं उत्सुक असतात, यांत कांहीं नवल नाहीं. हा पहा, त्यांचा बाग देखील मी त्यांच्या घरचा पाहुणा असें समजून आपल्या चित्रवि-चित्र सृष्टिसौंदर्यानें माझें मन रमविण्याचे कामीं कसा अगदीं दक्ष आहे! हा बगीचा माझा पाहुणचार योग्य रीतीनें करितो किंवा नाहीं हें पाहण्याकरितांच जणों साबाजीरावानीं आपल्या लाडक्या कन्येला येथें पाठविलें असावें.

वृं०—( आपल्याशीं ) बोलण्याची आयती संधि आली आहे; मग ती फुकट कां दवडा? शिवाय इथं तिसरं कोणी नसल्यामुळं कोणी ऐकेल सवरेल याचीही भीति नाहीं. ( उघड ) कोणी परकी आपल्या घरीं आले असतां त्यांचा सत्कार करणं व ते आपल्याइथं

असेपर्यंत त्यांचें मन आनंदित राहील असे उपाय योजणें, हा गृहस्थधर्मच आहे. त्यांत आमच्या बाबांनीं कांहीं विशेष केलें आहे, असें नाहीं. आतां कसाही पाहुणचार असला, तरी तो मान्य करून घेणें हें पाहुण्यांचें सौजन्य. ते थोर मनाचे असले ह्मणजे अर्थात् दुसऱ्याला नेहमीं थोरपणा देतात. बाबांचे पाहुणे ते घरच्या सर्व मंडळींचे पाहुणे नव्हेत का? मग त्यांचा परामर्ष आपल्या हातून होईल तितका घेण्याचे कामीं वृंदा कशी बरं चुकेल? थोरांचा पाहुणचार करण्याचा योग कांहीं नेहमीं येत नाहीं.

**नानासा०**—( आपल्याशीं ) अहाहा! किति गोड किति सरळ आणि किति मर्यादशील भाषण हें! अशा सुशील रत्नाचा लाभ मला कधींतरी होईल काय? नांव देखील किति मधुर! वृंदा वृंदा!! माझ्या अंतःकरणरूप चौथुऱ्यावर हें वृंदावन बांधलें गेलें. तें आतां येथून कांहीं केल्या ढळावयाचें नाहीं. ( उघड ) सावजीरावांचा हा पाहुणा त्यांच्या सुशील कन्येच्या पाहुणचाराला योग्य असला, ह्मणजे वावगें कांहीं नाहीं. ( जवळ पसरलेल्या जाईचें पुष्प तोडून घेऊन ) अहाहा! आपल्या सौंदर्यानें व नूतन पुष्पबहारानें दुसऱ्यांचें मन मोहित करणाऱ्या ह्या जाईच्या लतिकेनें माझ्या चित्तवृत्ति अगदीं गुंग करून टाकिल्या. पण हिचा मला नित्य सहवास कसा घडणार?

**वृं०**—( आपल्याशीं ) या भाषणाच्या ओघावरून माझे हेतु सफळ होण्याचीं बरींच चिन्हें दिसताहेत.

पण बाई कोणाला ठाऊक! दुसऱ्याला गोड वाटेल असं नेहमीं भाषणं करणं, हें एक थोरांच्या चांगुलपणाचं दर्शक असतं. तेव्हां खरा मनोदय समजल्या वांचून उतावीळपणा दाखविणं हें खऱ्या कुलीनपणाला योग्य नव्हे. पडदा आड ठेवूनच मनोगत जाणणं योग्य. ( उघड ) गिरिजे, बाबांनीं जिवापेक्षां जास्त जोपा करून वाढविलेल्या ह्या जाईच्या वेलीला ते सुंदर मंडप कधींग वाळणार? हें पाहिलेंस का, ती ह्या सभोंवताल्च्या इतर अनेक फुलझाडांकडे न वळतां त्या मदनबाणाच्या ताटव्याकडेच धांव घेत आहे. कारण आपल्याला शोभविणारा तो आधारभूत मंडपच तिला मनापासून आवडला आहे. पण बाई, रूपानं व सुवासानं सर्वांना प्रिय वाटणाऱ्या अशा त्या मदनबाणाला जाईचा सहवास प्रिय वाटेल किंवा नाहीं कोणजाणें!

नानासा०—वा! अशी शंका कोणाला तरी येईल का? जाईचा नित्य सहवास कोणाला बरें अप्रिय वाटेल? जातिवंत, दिसण्यांत सुरेख व सुकोमळ अशा जाईचा लाभ मदनबाणाला झाला, तर त्याच्या भाग्याला दुनियेंत दुसरी जोडच नाहीं. पण तो व्हावा कसा?

वृंदा—आपल्या मनानें तिकडे धांव घेणाऱ्या गरीब जाईवर मदन बाणानं अनुग्रह करण्याचं मनांत आणिलं, तर ती खरोखर आपल्याला धन्य मानील. पण बाई असा सुदिन कधीं तरी उगवेल का? ( इतक्यांत ' वृंदे कुठग गेलीस? देवाला नाहींका बाई तुला यायचं ' असा पडद्यांत शब्द होतो व वृंदा घाईघाईनें बागेंतून घरीं जाते )

नानासा०–( आपल्याशीं ) अरे, कितीतरी मी अभागी! सोन्यासारखी आयती आलेली संधि माझ्या मूर्खपणानें मी दवडली. मग आतां हळहळ मानून घेतल्यानें काय होणार? उगीच मनाच्या संतापाला मात्र कारण. ( किंचित् विचार करून ) नाहीं पण; एका अर्थी झाला तो प्रकारही ठीकच झाला. कारण, त्या लावण्यलतिकेच्या क्षणिक समागम–सुखानें जर मी इतका वेडावून गेलों, तर आणखी कांहीं वेळपर्यंत वृंदेला कोणी हाक मारिली नसती, तर माझी काय अवस्था झाली असती कोण जाणें? प्रेमपाशांत सांपडण्याचा आजचा प्रसंग टळला, ही एक मजवर ईश्वराची कृपाच ह्मणावयाची. कारण, पितृकार्याचा भार शिरावर असतां मी प्रेमाच्या नादीं गुंतलों तर जग काय बरें ह्मणेल! कांहीं असलें तरी मला उद्ईक येथून निघालेंच पाहिजे. रामचंद्रपंतांचा निरोप जितका लवकर मिळेल तितकें चांगलें. तेव्हां आतां दुसरा तिसरा विचार मनात न आणतां त्यांच्याकडेच जावें. ( जातात )

## प्रवेश ६ वा.

स्थळ—गजेंद्रगडाजवळचें रान.

( नानासाहेब फकीराच्या वेशानें प्रवेश करितात. )

नानासा०–( आपल्याशीं ) सातार्‍याहून रामचंद्रपंतांचा निरोप घेऊन निघते वेळीं कोणाला वाटेंत माझा संशय येऊं नये ह्मणून हा फकीराचा वेश घेतला तरी शत्रूंचा त्रास कांहीं चुकला नाहीं. आबा-

साहेब मी केव्हां येतों ह्मणून तिकडे माझी वाट पहात असतील. पण मी तरी काय करूं? आतां एवढें सुदैव समजावयाचें कीं मी खरोखर फकीर आहें अशी मुद्देबिहाळ येथील मिरखानाची लवकर खात्री झाली, ह्मणून त्यानें मला सोडून दिलें. त्यानें सोडिलें तरी कर्मानें कोठें अद्याप माझी पाठ सोडिली आहे! हुनगुंदास आल्यावर मागच्यासारखें होऊं नये यासाठीं मी धर्मशाळेंत न उतरतां मुद्दाम मशीदींत जाऊन उतरलों. पण तेथेंही मोंगल शिपाई माझ्या पाळ्यावर ठेवलेलेच. माझा सुगावा त्यांना कसा लागत असेल, तें ईश जाणे! असो. गांवापासून सुमारें दहाबारा कोसांचा पल्ला सहा तासांत झंपल्यामुळें पाय कसे अगदीं दमून गेले आहेत. शिवाय, आतां मागें फारशी भीतिही नाहीं; तेव्हां सावकास सावकास जावें पुढल्या मुक्कामापर्यंत.

( पडद्यांत )

मिरझा—दाऊद, लोक बोलते है, के वोह फकीर येही रस्तेसे निकल गया. इसवास्ते मैं इधरसे जाता हूं. तुम दुसरे रस्तेसे आकर मुझे अवत्रके गांवमे मिलना.

दाऊद—अच्छा. हगरी तलावके पास जो रस्ता जाता है, वो रस्तेसे हणमंतराव चले गये. मै तिसरा रस्ता पकडताहूं. अब ओ फकैर साला किधर जावेगा?

( मिरझा नानासाहेबांस गांठतो. )

मिरझा—( दुरून ) फकैरसाहेब, किधर चले?

खडे रहो! ( जवळ येऊन हात धरतो व दाढीकडे न्याहाळून पाहून ) साहेब, तुमारी दाढी तो बहोत उमदी दिखती है! ( दाढीस हात घालतो तों दाढी हातांत येते ) काफर, हिंदू होकर फकैरका वेष लेनेकू और मशीदमे आनाज खानेकू शरम कैसी नही आयी? बेहोष, आपनी जात छोडकर ठकबाजी करके मुसलमिन सरदार अमीरोंकू चिपी सताना, यही तुमारा ऐसा कमजात मऱ्हेठोंका काम. अब चलो हमारे सरदार साहेबके पास.

**नानासा०**—सिपाय भाई, मै तो मुसलमीन फकैर है सच. फिर मेरी उमर छोटी; दाढी न रही तो तुमारे ऐसे मेरे जातभाईभी मेरेकू मऱ्हाठा समजकर बहोत सताएंगे; इसालिये ये बनावट दाढी लगाकर फिरताहूं. हमारे ऐसे गरीब फकैरकू पकड लेजानेसे तुमको क्या मिलेगा?

( हणमंतराव व दाऊद प्रवेश करितात. )

**मिरझा**—देखो हणमंतराव, ये अदमी तो बहोत काफर है. अभी एक घंटा देर होतीथी, तो सब काम चुकताथा. ( हातांतील दाढी दाखवून ) ये देखो इसकी दाढी.

**दाऊद**—( दाढी आपल्या हातांत घेऊन ) क्या बात है! जिस कारागिरने ये दाढी बनाया उसकू इनाम देनेमाफक उने काम किया है. ( नानासाहेबा कडे बघून ) क्यौं मौलासाहेब!

**हण०**—मिरझा, त्या मामव्याशीं मुळींच बोलूं लागूं

नका. आधीं बेडी ठोका; मग बाकीचें. साताऱ्यास गेलेला संताजीचा पोरटा तो हाच. सरदार नागोजीरावानीं लिहिल्यावरून मुद्देबिहाळ येथील मोंगल फौजदारानें याला कैद करून ठेविलें होतें. पण तेथून तो इकडे तिकडे थापा मारून निसटल्यामुळें मला त्याचा शोध करीत तुमच्या गांवापर्यंत यावें लागलें. ( नानासाहेबाकडे पाहून ) कसें काय राणोजीराव? दाढीबिडी फार सजविली होतीत! पुरें; आतां तरी सोडा तो स्वराज्याचा नाद.

**नानासा०**—हणमंतराव, मीं ह्मटलेंच कीं, माझ्या अशा पत्त्यावर राहणारा कोणी तरी आपल्या पैकींच निमखहराम असला पाहिजे. तुह्मी आतां मोंगलाकडे गेलां वाटतें! असो; तुह्मांला बरें वाटलें तें तुह्मीं केलेंत. पण दुसऱ्यांनींही तसेंच करावें, हें ह्मणणें कोणालाही शोभत नाहीं. ज्याचें इमान त्याच्या बरोबर.

**हणमं०**—(रागावून) मोठा आला आहे इमानाच्या गोष्टी सांगायाला! तुझ्या बापानें आजपर्यंत इमानें इतबारें स्वराज्याची सेवा केली त्याचें बक्षीस त्याला कसें मिळालें, हें तूं पाहतो आहेसच. इतकें असूनही जर तुला त्या अक्कलशून्य रामचंद्रपंताचा आणि महाराजांचा नाद सोडावयाचा नसेल, तर आतां ह्या सांखळ्या वाळ्यांच्या डौलांत मना मारीत रहा खुशाल. पाय पुढ कर. मिरझा, कोठें आहे ती बेडी? ठोक याच्या पायांत आणि चला याला घेऊन गांवांत. ( मिरझा बेडी घालितो. ) बोल कसें काय आतां? मोंगलांच्या

पदरीं नोकरी करण्याचें कबूल करीत असलास, तर ही बेडी खोलून तुला आतांच मजबरोबर मोंगल छावणींत नेतों. बघ, विचार कर. नाहीं तर हालअपेष्टा भोगून मरायचें आहेच तुझ्या नशीबीं !

**नानासा०**—( आवेशानें ) हणमंतराव, स्वराज्यांत दुहीं माजवून आबासाहेबांमध्यें व धनाजीरावामध्यें द्वेषाग्नि उत्पन्न करण्याला कारण तूंच झालास, असें मी आजपर्यंत कानांनीं ऐकत होतों. पण आतां ह्या आपल्या कृतीनें तूं किती नीच, किती अधम आणि गोताला काळ होणारा चांडाळ आहेस, हें प्रत्यक्ष माझ्या अनुभवाला आणून दिलेंस; तेव्हां याबद्दल तुझे मला उपकारच मानिले पाहिजेत. हे अजब गुण तुझ्या ठिकाणीं होते ह्मणूनच आबासाहेबानीं तुला सुभेदारी दिली नाहीं. एरव्हीं दत्ताजी काय किंवा तूं काय त्यांना दोघेही सारखेच होतां. त्यांना तुझ्या ह्या अमोलिक गुणांची व अपूर्व स्वामिभक्तीची पारख होती ह्मणून बरें; नाहींपेक्षां तूं आणखी किती ठिकाणीं आग लावितास नकळे!

**हणमं०**—नकळे कां ? माझ्या आंगीं काय काय करामत आहे, ही तुला थोडक्याच दिवसांत कळून येईल. तुझ्या सारखाच तुझ्या बापालाही चतुर्भुज करून दोघां बापलेकांना मोंगल सरदारांचे तंबू झाडावयास लाविलें, ह्मणजे मग कोण नीच आणि कोण अधम हें समजेल. तीन कवडीच्या स्वराज्याची तुला इतकी कसली बढाई वाटते कोण जाणे! पण बीज तसा अंकूर; त्यांत तुझा तरी काय दोष! स्वराज्याच्या पायीं तुझ्या

बापाला वनवास भोगण्याची पाळी आली असतांही जर त्याचा पोकळ अभिमान जात नाहीं, तर त्याचाच पोरटा तूं! उद्यां जिंजी सर होऊन राजाराम व त्याच्या दरबारच्या लोकांची दुर्दशा उडालेली कैदेंत राहून या कानांनीं ऐकलीस, ह्मणजे तुझ्या ह्या सगळ्या गमजा आपोआप उतरतील.

**नानासा०**—हणमंतराव, असे हे बेशरमपणाचे शब्द तोंडावाटे काढण्यास तुला लज्जा कशी नाहीं वाटत? तुझ्यासारखे निमकहराम व कुळकलंक आमच्यांत आहेत तोंपर्यंत स्वराज्यावर अनेक संकटें ओढवतील व वडिलांसारख्या राजनिष्ठ पुरुषांना अनेक यातना सोसाव्या लागतील हें खरें. पण तुजसारखे वरबुडवे आणखी कितीही शत्रुपक्षास मिळाले, तरी त्या पुण्यप्रताप शिवछत्रपतींनीं स्थापिलेल्या स्वराज्याचें काडी इतकेंही वांकडे होणार नाहीं हें पक्कें समज. मी तुझ्या हातीं सांपडल्यामुळें तूं माझे हाल करणार हें मी जाणून आहे. माझें तुला काय करावयाचें असेल तें कर; पण माझ्या देखत वडिलांसंबंधानें दुरुत्तर बोलशील किंवा मोंगलांची सेवा हे शब्द तोंडावाटें काढशील, तर (अंगावर धांवून) प्राणाशीं गांठ आहे समजलास? दुसरें कांहीं बोलावयाचें असेल, तर खुशाल बोल.

**हणमं०**—तुझ्यासारख्या शतमूर्खांबरोबर काय बोलणार? दैव चालून घरीं आलें असतांही त्याला लाथेनें झिडकारून देणाऱ्या घमंडानंदनाची होते आहे तीच शोभा योग्य. ह्मणतात ना 'गाढवापुढें गाइली

गीता आणि कालचा गोंधळ बरा होता.' दाऊद, देखते क्यौं? इस साळेको खैंचकर ले चलो गंवमे.

मिरझा–हणमंतराव, तुम आये अछी बात हुयी. नहींतो ये बिलंदर मेरेकू बोलताथा, की आप तो मुसलमीन है सच. फिर, कोई आपनेकू मऱ्हेठा समजकर अटकाव नही करना इसालिये बनावट दाढी लगाया हूं. वाहवारे मुसलमीन! (त्याास हिसका देऊन) चोर साले, पांव उठाव. जल्दी चलो. (दोघे ओढतात.)

हणमं०–अरे ओढूं नका त्याला; हळू चालवा. त्याचे पाय दुखतील ह्मणून नव्हे हो! पायांतील सांखळयावाळयांच्या 'खाळखुळ, रुमझुम' अशा मंजुळ आवाजाच्या नादांत पुरतें स्वराज्यसुख घेऊं द्या त्याला. चला. (सर्व जातात.)

---

## प्रवेश ७ वा.

स्थळ–ब्रह्मपुरी येथील झुल्फिकारखानाचा तंबू.

(झुल्फिकरखान व दाऊदखान बोलत बसले आहेत.)

झुल्फि–दाऊदखां, रहिमत उद्दवला संताजीकी मुलाकात करके कल ही छावणीमें वापस आगया. उसके कहनेपरसे ऐसा मालूम होताहै के, संताजी पादशाहाकी खिद्मत्मे सरदारी कबूल न करेगा. हरएक तऱ्हेकी लालूच दिखाकर उसका दिल फिरानेके लिये इतने दिन कोषीष करके कामयाबी न हुई.

आज दो रोजसे हणमंतरावके तरफकी कुछ खबर न समजनेसे दिल बेचैन है. नागोजी अभीतक क्यौं न आये, ये कुच मालुम होता नही.

दाऊ०—खांसाहेब, पादशाहाकी मर्जी रखनेकेलिये लोग रातदिन कोषिष करते हैं, जिसकी चाहे उसकी ऑजझी करते हैं, और जो चाहो वोह नोकरी करनेकेलिये तयार रहते है. ऐसा होतेही संताजीनें पादशाह खुद सरदारी देते हुये नाकबूल करना, ये बडी ताअजुबकी बात है; ऐसा कोयी सिगाना आदमी हातसे मुफत जाने न देगा. इसके सिवाय संताजीका मालिक राजाराम उसपर गुस्ता होनेसे उसकी बेइजती हुयी, और वो मऱ्हेठोंकी छावणी छोडकर जंगल जंगल फिरताहै. इसलिये, अब उसका दिल फिरानेकेलिये कुछ देर लगेगी, ऐसा मुझे मआलूम नही होता. रहिमत उद्दवलासे ये काम न होसके, तो दुसरे कोई सरदारकी तकलीफ करना.

झुलफि०—दाउदखां, जो काम रहिमतउद्दवलासे न हुवा वो क्या दुसरेसे खाक होगा! क्यौंके, दुसरेका दिल लेकर आपना काम करलेनेवाला हुषियार और आपना काम करवाकर फिर आपना फिकरा तेज रखनेवाला दूर अंदेश पातशाहाके दरबारमें मिलना मुष्कील. उसकी कुई कोषीष बाकी रही, ऐसा बिलकुल नही. मगर, संताजी ये कोई कम रुतबेका शख्स नही. उसके मुवाफिक जवामर्द, और जब उसने किसीको कोल दिया तो जानभी देनेको डरनेवाले नही, ऐसा

सिपाहसालार तमाम मऱ्हेठोंमे मिळना मुष्किल. उसने खुतकी रियासतकेलिये आजतक न कुच कम तकलीफें सही; बाजेशक्स आपके दुष्मनकी सिफ्त गाना गुन्हा समजते है; मगर हातिमदिल लोग आपने दुष्मनकी तारीफ सुनकर खुष हुये बगर रहेते नहीं. इसलिये, ऐसा हुषियार व जवामर्द आदमी आपनी खिदमतमे रेहना, ऐसा पादशहाके दिलसे है; और मेरीबी कोषीष चली है. ऐसा मवका फेर कभी हात न आयेगा.

दाऊ०—खांसाहेब, संताजी ऐसा काबिल जवामर्द होते हुवे उसका मालिक जानबूजकर उसकी बेइज्जती करनेकेलिये तयार है, तो वो अहकम रहना चाहीये. तब ऐसे अहकम मालककी नौकरी करनेसे मोंगलिया पादशहाकी खिदमतमे सिपाहसालारी जिसका खुदबखुद मवका आया है, तो उसका दिल जरूर फिरेगा. क्यौंके कुछभी हुवा तो हरयेकको आपने अब्रूकी शरम रहने चाहिये. इसके सिवाय जो बेइज्जती हुई उसका इंते काम लेनेका मवका पाकर बाकीकी तमाम उमर आरामसे गुजारी जावे, तो किसकी ना है!

झुल०—नही, नही! दाऊदखां, आपने खुद्के आरामकेलिये खियाल करके आपने बापदादाकी इज्जतको बट्टालगानेके माफिक दहशतनाक और फितूरके काम करनेको संताजी तय्यार होगा या नही, इसका मुझे शुभा है.

दाऊ०—गर ऐसा है, तो उसका दिल लेनेकी इतनी कोषिष किसलिये चाहीये? वो हमारी बाजू ना आया,

तो क्या पादशहाके दरबारमें खानदानी व जवामर्द सरदार कम है? मऱ्हेठोंके जैसे कमकुवत दुष्मनोंके शिकस्त देनेके लिये हमारे दरबारका एक अदना सरदार काफी है.

झुल०—सच; आज खुदाकी मेहरबानीसे पादशाहाका इक्बाल बुलंदहै, व मोंगलोंके दरबारमे लाखो सिपाह व हजारों जवामर्द सरदार हैं. मगर संताजीके मुवाफिक दिलेर व हिम्मती मऱ्हेठे सरदारकी गिनती अगर हुई, तो हकीकतमे उमदा बात होगी. क्योंके, अलिमर्दखां, काशीमखांके मुवाफिक आपने बडे जबरदस्त पठाण सरदारकों पुरी शिकस्त दिई इसलिये तमाम कर्नाटकमें उसका एक रोअब बैठाहैं; बल्के के मोंगल सरदारोंके दिलपर उसका रोअब ऐसा छाया है के, उन्नोंने खामोषी इख्तियार की है. इसलिये, संताजी हमारी नोकरीमें आयेगा, तो सब फिकरें दूर हो जाईगीं; और मऱ्हेठोंमे फूट डालनेकेलिये जो कोषिष नागोजीरावके मारिफत आज कितने एक महिनोसे चलीहै, उसकाम्मे फतह हुवे मुवाफिक होगा. नही तो, अगर धनाजी व संताजी फिर एक होकर अव्वलके मुवाफिक आपने रीयासतकी इज्जतकेलिये कमरबस्ता खडेहुये तो मऱ्हेठोंको खाकमे मिलानेके लिये कितनी देर लगेगी, येह कहा नही जाता! इसलिये, पादशाहाका फर्मान हुवा है के, जो कोई संताजीको गिरफतार करके बादशहाके खिदमतमे लावेगा, उसकू लायख इनाम या जाहगीर मिलेगी.

दाऊ०—खांसाहेब, अब इस तरकीबसे संताजी बेखटके हात लगेगा. क्यौंके, इमानकी लालुचसे आपनी जान धोकेमें डालनेवाले सरदार मऱ्हेठोमें बहोत मिलेंगे और सरकारकी कोषिष चीज होगी.

झुल०—खुदाकी मेहेरबानीसे ऐसा होगा, तो बहोत उमदी बात! अच्छा; दाऊदखां, अब बादशाहाकी मुलाखत लेनेवास्ते मेरेकू जाना है. तबतक तुम नागोजीरावकू मिलना और कमजास्त खबर क्या है इसका तलास लेना.

दाऊ०—जरूर ले आताहूं. (सलाम करून जातो)

अंक २ रा समाप्त.

---

# अंक ३ रा.

## प्रवेश १ ला.

स्थळः—सातारा येथील साबाजीरावाचें घर.

(वृंदा एकटीच विचार करीत बसली आहे.)

वृंदा—मनुष्याची वेळ फिरली ह्मणजे पदरचीं यःकश्चित् माणसं देखील उलट बोलूं लागतात असं जें ह्मणतात तें घटकोघटकीं माझ्या प्रत्ययास येत चाललं आहे. त्याबद्दल आतां वाईट वाटून घेऊन काय उपयोग? माझी आई मी लहान असतांच जरी मरण पावली, तरी आजपर्यंत बाबांनीं मला तिची आठवण

होऊं दिली नव्हती. गोजराबाईसाहेबांच्या मनांत सापत्नभाव वागत असला, तरी बाबांचं मजवर अतिशय प्रेम असल्यामुळं सावत्रपणा दाखविण्यास त्यांना कशी ती सवडच मिळाली नाहीं. पण माझंच नशीब फुटलं तिथं आतां दुसऱ्यांना बोल लावून काय उपयोग? बाबा जिवंत असते, तर मला उणीं उत्तरं बोलण्याची कोणाची प्राज्ञा होती? पण ते दिवस गेले; ह्मणून जी गिरिजा पूर्वीं 'ताईसाहेब, ताईसाहेब' असं ह्मणून माझ्या पुढं नाचत होती, तीच आतां बाईसाहेबांची मर्जी संपादण्याकरितां पावलोपावलीं मला आजेसासवे सारखी गांजूं लागली आहे. बाबांना मरून अजून पुरे दोन महिने देखील लोटले नाहींत तोंच जर बाईसाहेबांच्या डोळ्यांत मी इतकी सलूं लागलें, तर आतां पुढं माझा निभाव कसा लागणार! सावत्रआई असली तरी मी त्यांना सख्या आईपेक्षांही जास्त मानीत आलें. कित्येक वेळां बाबांचा राग देखील मजवर ओढून घेण्यास मी मागंपुढं पाहिलं नाहीं. अशा रीतीनं भिऊन भिऊन वागत असतांही त्या कुलस्वामिणीनं असा प्रसंग मजवर आणिला! कसंही बोला, कसंही वागा, त्यांचं आहे तें आहेच. मला घालून पाडून बोलण्याची त्या संधि पहात असतात. जिवंत राहून असा हा त्रास सोसण्यापेक्षां मी लहानपणींच मेलें असतें किंवा बाबांच्या ऐवजीं देवानं मला नेलं असतं, तर सोन्यापेक्षांही पिवळं झालं असतं. पण ह्या कपाळकरंटीच्या नशीबीं भोगायचं आहे तें सुटतं

कसं! बाबा, मला अशा दुःखसमुद्रांत लोटून एकटेच कसेहो निघून गेलांत! देवा, पूर्वजन्मीं मी असं पातक तरी कोणतं केलं होतं? आतां मी कोणाच्या तोंडाकडे पाहून हें दुःख गिळूं! ज्यांच्या ठिकाणीं हें मन गुंतलं आहे व ज्यांनीं मला जन्माची सोबत देण्याविषयीं आश्वासन दिलं आहे त्यांच्याकड निघून जावं ह्मटलं, तर त्यांचाही कुठं पत्ता नाहीं. त्या मदन मूर्तीला माझा विसर तर पडला नसेल ना? कारण पुरुषांच्या मनांत उत्पन्न झालेलं प्रेम नदीच्या लोटा सारखं असतं. पण कसंही असलं, तरी रात्रंदिवस हा सावत्रपणाचा जाच सोशीत डोळ्यांतील पाण्याबरोबर घांस गिळीत इथं राहण्यापेक्षां, त्यांचा शोध करीत कुठं तरी जावं हें चांगलं. त्यांचा थांग लागेपर्यंत वनवासांत दिवस काढावे लागले, तरी चिंता नाहीं; पण हा त्रास नको.

( गिरिजा प्रवेश करिते. )

**गिरिजा**—ताईसाब, किती तरी हटकाव बगा! तुमासनी आतासं पोटाचंबी ध्येन नाहींसं झालया. वाडोळ वाट बघबघूनशान आईसाब जेवल्या नव्हका! असं, उगवला दिस रडूनरडून डोळ फुटल्याछ नी काय! शिळंपाकंच खायचं पराब्धीं हाय जणूं?

**वृंदा**—( सुस्कारा टाकून ) गिरिजे, ज्याचं कपाळ त्याच्या बरोबर; दुसरं का कोणी त्याचं वाटेकरी होतं? माझी कोणी वाट पहायला नको, आणि तुझं इतकं

डोळे वटारणंही नको. चार दिवस आले आहेत माझ्या नशीबीं बोलून घ्यायचे !

गिरिजा—दिस दिस ह्मणाया काय झालया तुमच्या नशीबाला ? चांगलं जेवता, खाता, समद सडगार चालल्याती नी काय ? आमच्या आईसाब चांगल्या म्हुन इकती तरी खान्याजेवन्याची इचारपूस करत्याती. न्हाईतर, तुमासनी इचारीत व्हतं कोन पापोस ?

वृंदा—गिरिजे, जेवायला बोलवायचं तें बोलीवलंस झालं. बाकी, जास्ती बोलण्याची तुला गरज नाहीं. ज्यानं त्यानं आपल्या योग्यतेनं रहावं हें चांगलं.

गिरिजा—बरं बरं ! आईसाबांना सांगतें येत न्हाइती ह्मनुनशान. ह्मनजे मग समजल कसं हायत्ये. आपल्या पोटाला खायचंखाऊन इनाकारन दुसऱ्याच्या पोटामंदी खड घालायचं त्ये हेंच ! होव तर या; मी चाललें. ( जाते. )

वृंदा—( गेलीसें बघून ) गेली का एकदांची धिंडका ? कोणा । हवं झालं आहे तें जेवण ! अशा जाचणुकींत राहून तीनदां जेवण्यापेक्षां परदेशांत उपास काढावे लागले, तरी चिंता नाहीं. सुखानं तरी मरण येईल. तेव्हां मनाचा जो निश्चय झाला तोच खरा करायचा. मग कांहींही होवो. संधि मिळेपर्यंत आपण कांहींच बोलूं नये, ह्मणजे झालं. पण ती नकटी तिकडे जाऊन आईसाहेबांना तिखटमीठ लावून भलतं सलतं सांगेल आणि तें त्यांना सारं खरंही वाटेल. तेव्हां आपणच

जावं आणि भूक नसली तरी पानावर बसून उठावं, ह्मणजे कोणाचं बोलून तरी नको घ्यायला. ( जाते. )

## प्रवेश २ रा.

### स्थळ–साताऱ्यांतील रामचंद्रपंतांचा वाडा.

( रामचंद्रपंत परशुरामपंत व खंडोबल्लाळ बोलत बसले आहेत. )

**रामचंद्र०**–परशुरामपंत, वेरहोराकडील काय बातमी आहे ?

**परशु०**–अद्याप कांहीं वर्तमान नाहीं. पण आज सायंकाळपर्यंत स्वार यावा, असा अंदाज आहे. नाना-साहेबांना येथून जाऊन सुमारें दोन महिने झाले. पण अद्याप संताजीरावांची व त्यांची गांठ पडली किंवा नाहीं हें कांहींच समजत नाहीं. संताजीरावांना एकदां आपला निरोप कळला ह्मणजे बहुतेक कार्य होईल.शिवाय, आपण नारोपंतांना पुढें काय करावयाचें तें लिहिलें आहेच.

**रामचंद्र०**–पंत, कर्नाटकांतून नारोपंतांचा जबाब किंवा ते समक्ष येईपर्यंत कोणतीच गोष्ट निश्चयात्मक सांगतां येत नाहीं. महाराजांपाशीं यावेळीं एखादा पोक्त व शहाणा मनुष्य असता, तर गोष्ट या थराला येतीच ना. पण आतां बोलून काय उपयोग? घसरलेली बाजू सांवरते कशी, एवढीच कायती विवंचना. महा-राजांच्या हातून संताजीची झालेली मानहानि शत्रूंच्या पथ्यावर पडण्याचा प्रसंग मात्र ईशकृपेनें न येवो !

**खंडो०**-हा असा विलक्षण प्रकार घडून आला, हेंच आधीं मोठें आश्चर्य! महाराजांच्या हातून जरी चूक झाली, तरी धनाजीरावांनीं दूरवर विचार करावयास पाहिजे होता. कारण, धनाजी व संताजी आजपर्यंत खऱ्या दोस्तीनें वागत आलेले; कोणतीही मसलत असो, स्वारी असो, एकमेकांच्या विचाराविरुद्ध ते कधींही वागले नाहींत. असा प्रकार असतां एकाएकीं जी ही विस्कटाविस्कट घडून आली व उभयतांमध्यें कलहाग्नि भडकून तो इतका विकोपास गेला, त्याचें तसेंच कांहीं कारण असलें पाहिजे.

**रामचं०**—चिटणीस, कारणाचा विचार करण्याची ही वेळ नव्हे व करून त्यापासून फायदाही नाहीं. कारण, आपलेच दांत आणि आपलेच ओंठ. तेव्हां त्याचा दोष अमक्याकडे आहे असें ह्मणणें ह्मणजे आपलेंच जगांत हंसें करून घेणें आहे. कोणीकडे पाहिलें तरी हें जग स्वार्थानें पूर्ण नाडलेलेंच दिसतें. आपल्यापेक्षां एखादा मनुष्य—मग तो दूरचा आप्त असो, मित्र असो किंवा सखा भाऊ असो—लोकांच्या मानास जास्त पात्र झाला असें वाटलें, कीं महत्वाकांक्षा व तिच्या आनुषंगिक बाकीच्या मनोवृत्ति सर्वांच्या ठिकाणीं आपोआप जागृत होतात. आतां ज्यांच्या ठिकाणीं सद्सद्विवेकबुद्धि जागृत असते, तेथें त्या मनोवृत्तींचें कांहीं चालत नाहीं. पण तसें नसलें ह्मणजे त्या अनावर झालेल्या मनोवृत्ति उमाळीसरशीं बाहेर उसळून आपला प्रभाव जगास दाखवावयाच्याच.

**खंडो०**—हुकुमतपन्हा, अमुक गोष्ट अशी आणि अमुक नोकर तसा असें ह्मणण्याचा अधिकार आमचा नव्हे. तरी पण एवढें खरें कीं, समरभूमीवरील योध्यांच्या डावपेंचापेक्षांही पदरच्या लोकांचे डावपेंच समजणें फार कठीण असतें. संताजीरावाचा तल्लख व बाणेदार स्वभाव वरवर पाहणाऱ्यांच्या डोळयांत कदाचित् सलण्यासारखा असेल. पण, मला तर असें वाटतें कीं वेळप्रसंगीं तशा तिखट स्वभावाच्या माणसांच्या हातून जी कर्तबगारी बजावली जाते किंवा जडजोखमीचीं कामें तशांच्या हातून जशीं तोललीं जातात, तशीं इतरांच्या हातून तोललीं जात नाहींत. मर्जी राखून गुळमट बोलणारांचा उपयोग ऐकणारांच्या मनाला आनंद देण्यापलीकडे फारसा होत नाहीं.

**रामचं०**—चिटणीस, तुह्मीं ह्मणतां तें पुष्कळ अंशी खरें आहे. परंतु आमच्या महाराजांना जगाचा जितका अनुभव असावा, तितका आलेला नाहीं. जेथें धनाजीरावासारख्या पोक्त व अनुभवी सरदाराला आपल्या मित्राच्या अंगच्या खऱ्या गुणांची पारख झाली नाहीं, तेथें महाराजांची बुद्धि चकली यांत नवल तें कसचें? कसेंहि असलें, तरी त्या दगलबाज हणमंतरावानें धनाजीला इरेस घालून जो हा डाव टाकिला आहे, त्यापासून स्वराज्याला होणारा अपाय टळेल व त्याचीं बोटें त्याच्याच डोळयांत घालितां येतील, असा कांहीं उपाय योजिला पाहिजे. नाहींपेक्षां हा गृहकलह कोणत्या थराला जाईल, हें सांगवत नाहीं.

परशु०—खरें आहे. कारण, संकटाच्या वेळीं घरांत दुफळी उत्पन्न होणें, यासारखें दुसरें कोणतेंही दुर्दैव नाहीं. आणि आमच्या नशीबानें तें तर सदोदित आमच्यापुढें दत्त ह्मणून उभें असतें. मोंगलांच्या गुलामगिरींतून आह्मी जरासें डोकें वर काढण्याचा यत्न करितों, तों आमचेच लोक आह्मांस अधिक चिखलांत बुडविण्यास हातांत सोडगा घेऊन कसे टपून बसलेले असतात! व अशी स्थिति आहे ह्मणूनच हिंदु-लोक ह्मणजे केवळ नादान, भाकरीचा तुकडा तोंडावर टाकला कीं त्यांनीं गुलामगिरीचें जूं सुखानें खांद्यावर घेतलेंच, अशी मोंगलांची समजूत होऊन बसली आहे. शिवाय, हणमंतरावासारख्या निमखहराम व श्वान वृत्तीचीं माणसें त्यांची ती समजूत दृढ होण्याला आमच्या कम नशीबानें वरचेवर उत्पन्न होताहेतच. तेव्हां अशा ह्या स्थितींतून स्वराज्य पार पडणें खरोखर कष्टाचें आहे.

रामचं०—पंत, विशेष भीति बाळगण्यासारखें यांत कांहीं नाहीं. आपली परंपरा पाहिली ह्मणजे हा प्रकार पूर्वीपासून असाच चालत आला आहे. थोरल्या महाराजांच्या वेळीं व त्यापूर्वीं सुद्धां महाराष्ट्रांत व कर्नाटकांत गोरगरीब लोक मोंगलाच्या जाचामुळें टेंकीस येऊन जरी निराशेनें अगदीं निमूटपणें दिवस कंठीत होते, तरी कित्येक सरदारी बाण्याच्या लोकांची व त्यांचा कित्ता गिरविणाऱ्या पोटभरू लोकांची नजर बादशहाच्या दरबाराकडे असे. मोंगलांची सेवा करावी, आणि

प्रसंग येईल तेव्हां आपलें घोडें पुढें ढकलून आपल्या मुलांबाळांची बडेजाव वाढविण्याची खटपट करित असावें, अशा लोकांचीच संख्या फार होती. पण तशा आपमतलबी लोकांच्या करणीकडे लक्ष न देतां स्वीकारल्या कामासाठीं जिवासजीव देणारे व अत्यंत विश्वासु अशा थोड्या लोकांच्या हिंमतीवरच थोरल्या महाराजांनीं मोंगलबादशाही तुडविण्याचा यत्न केला नाहीं काय? तेव्हां कित्येक हरामखोर निपजले तरी त्यांच्या निंद्य कृतीमुळें धैर्य न टाकितां प्रत्येकानें जगास उदाहरण घालून देण्याजोग्या स्वतांच्या स्तुत्य वर्तनानें-च मोठा कार्यभाग संपादण्याचा यत्न केला पाहिजे. खरे स्वामिभक्त व गळ्यावर कोणी सुरी ठेविली तरी ज्यांच्या हातून कालत्रयींही विश्वासघात घडावयाचा नाहीं अशी मंडळी पूर्वी महाराष्ट्रांत बरीच निपजून गेली व अद्यापही आहेत. त्यांना हातीं धरून त्यांच्या कडून कार्य करून घेणारीं शहाणीं व चतुर माणसें मात्र पाहिजेत एवढेंच.

( इतक्यांत एक स्वार लाखोटा घेऊन येतो व राम-राम करून लाखोटा परशुरामपंतांच्या हातीं देतो. )

परशु०—ह्मादबा, वेल्लोर सोडून आज किती दिवस झाले? ( लाखोटा रामचंद्रपंतांच्या हातीं देऊन ) ह्मा-दबाचें टिपण कधीं चुकावयाचें नाहींच!

राम०—( पत्र वाचून ) ठीक आहे. चिटणीस, तुह्मी व परशुरामपंत उद्ईक गुत्तीस जाण्याची तयारी करा. गुत्तीची कामगिरी आदपतांच धनाजीरावांना

भेटून तुह्मांस होतां होईल तों जलद जिंजीस जाऊन पोंचलें पाहिजे. नारोपंतांच्या लिहिण्यावरून शत्रु जिंजीसभोंवतीं लवकरच मोर्चेबंदी करतील असें दिसतें. त्यापूर्वीं तुह्मी किल्यावर जाऊन पोंचलांत, ह्मणजे कसाही प्रसंग आला तरी विशेष भिण्याचें कारण राहणार नाहीं. तुह्मांला सर्व तजविजी सांगून ठेवल्याच आहेत. जी साधेल ती मसलत योजून कार्यभाग साधण्याविषयीं मात्र दक्षता ठेवा, ह्मणजे झालें. परशुरामपंत, तुह्मी नारोपंत साताऱ्यास येऊन परत जात तोंपर्यंत वेल्होरासच मुक्काम करा. नारोपंतांची खटपट तडीस गेली तर या अपसांत वाढलेल्या दुहीचा शेवट लवकर गोड होईल, असें दिसतें.

**चिट०**—ही स्वराजावर मध्येंच आलेली वावटळ ईशकृपेनें दूर झाली ह्मणजे मग जिंजी सर करण्याची झुलफिकारखानाची प्रतिज्ञा कशी शेवटास जाते, तें पाहूं!

**राम०**—चिटणीस, ह्मण आहेना? “ए बी दिन जायेगा” तसा महाराजांच्या पुण्याईचा जोर असला तर याहीपेक्षां भयंकर संकटें आलीं ह्मणून काय होणार! बरें; आतां तुह्मी उभयतांही जा आणि उदईक निघण्याची तयारी करा.

**दोघे**—होय; आज्ञेप्रमाणें निघतों. ( नमस्कार करून ) घेऊं तर निरोप आतां?

**राम०**—या.

( जातात. )

## प्रवेश ३ रा.

### स्थळ—मुद्गलाजवळचें जंगल.

( फिरोझजंग व अबदुल्ला जंगमाच्या वेशानें प्रवेश क० )

**फिरो०**—अबदुल्ल, संताजी और उसके साथीदार ये गौंमे आयेथे, इसमे कुछ संदेश नही. हम ये जंगमका पेहराव नही करतेथे, तो ये लिंगायत लोगोंके गांवमे हमकू कुछबी खबर ना मिलती.

**अब०**—सच बात खांसाहेब. ये लिंगाईत जात बहोत खराब. मुसलमिनको इन्हों आपने घरके नजदीक भी आने नही देते. हम जंगम है ऐसे समजकर बडा बेपारी बसाप्पा बळ्ळी हमको आपने घरकू ले गया और उदर हमको सबकुच खबर मिळी. अब ये आसपासके दो चार गौंमे येही पेहरावसे जाकर तलास किया, तो संताजीका तलास खास लगेगा.

**फिरो०**—अबदुल्ल, ये पेहरावका मेरेकू बहोत बेजार आगयाहै. कनडी बात अच्छी तऱ्होंसे आती नही और उसकेबिना चलताही नही. ये उळ्ळेगड्डी और भकरी खानेसे तो ताखत सब गई. फिर क्या करना! अबदुल्ल, इदरसे दुसरा गांव कितना दूर है ?

**अब०**—खांसाहेब, अब्बी दो कोस है. जल्दी न करे तो रस्तेमे अंधार होगा.

**फिरो०**—अच्छा; जलदी चलो. ( निघून जातात. )

## प्रवेश ४ था.

( जोगिणीचा वेश घेतलेली वृंदा किनरी वाजवीत प्रवेश करिते. )

( पद-राग कालंगडा ताल धुमाळी )

बंगला खूब बनाया बे। इसमे नारायन सोया बे॥ ध्रु०॥ पंचतत्वकी भीत बनाई तीन गूनका धारा॥ राम नामकी छान सवारी चैतन धुंड न हारा॥ १॥ जिस बंगलेकूं दस दरवाजे बीच पवनका थंबा॥ आवे जावे हर कोई देखे येहि बडा आचंबा॥ २॥ पांच पचिससों पातर नाचे मनवा ताल बजावे॥ सुरतमुरतका मृदंग बाजे राग छतिस सब गावे॥ ३॥ अपरंपार पार न पाया गुरुनें भेद बताया॥ कहत कबीरा सुन भइ साधू वांको अंत न पाया॥ ४॥

वृंदा-( आपल्याशीं ) हा विचित्र वेश धारण करून घर सोडल्यास आज चार महिने होत आले. सातारा सोडल्यापासून मला लम्माणांच्या तांड्याची सोबत मिळाल्यानं मी आजपर्यंत निर्भय होतें. पण माझ्या फुटक्या नशिबामुळं वाटेंत चोरट्यांनीं लम्माणास एक सारखा त्रास दिला. तेव्हां त्या तांडेवाल्याला माझा काय संशय आला कोण जाणे! त्यानं मला आपल्या बरोबर येऊं नको असं साफ सांगितलं. आतां या रा-

नावनांतून माझा एकटीचा कसा निभाव लागणार! कांहीं झालं तरी ईश्वरावर भार टाकून आलेले दिवस काढले पाहिजेत. आई जगदंबे, तुजवांचून माझं असं या जगांत आतां कोणी राहिलं नाहीं. प्राणेशा, आपल्यासाठीं असलीं आणखी शेंकडों दुःखं देखील सोसण्यास ही दासी तयार आहे; आपण मात्र इचा विसर पडूं देऊं नका. ( हातांतील किनरीकडे पाहून ) सखे, तूं निर्जीव खरी; पण तुझा व माझा सहवास झाल्यापासून या परदेशांत तूंच माझ्या जिवाची करमणूक झाली आहेस. अहाहा! तुझा हा मंजुळ स्वर आणि बागेत माझ्या कानीं पडलेलं तें मधुर व विनोदास्पद भाषण हीं दोन्हीं एकचशीं वाटतात. ( किनरी वाजवूं लागते. )

फिरो०–( पडद्याच्या आंत ) अबदुल्ल, ये गानेका सुर किदरसे कानपर आता है? आजुबाजू कोई अदमी तो दिखता नही. जंगलमें ऐसा मिठा आवाज आपेआप निकलना बोलेतो बहोत अजबकी बात!

अब०–( बाहेर येऊन इकडे तिकडे कानोसा घेतो इतक्यांत फिरोझजंगही प्रवेश करितो ) खांसाहेब, कोई एक औरत किनरी बजाते रस्तेसे चली है, ऐसा मालुम होता है. क्या बोलूं खांसाहेब!

फिरो०–अच्छा; आवे चलो, देखीये.

( दोघे वृंदेजवळ येतात व ती त्यांना पाहून दचकून उभी राहते. )

फिरो०–( वृंदेला पाहून आश्चर्यानें ) अबदुल्ल,

अल्लाके घरकी बात क्या अजब ! ऐसी सुरत दुनियेमे पैदा करके उसीको भीक मंगनेका वखत लानेमे खुदा तालाका क्या इरादा रहता है कोन जाने ! मेरा दिल तो इसीको छोडकर कभी नही रहनेका. ( वृंदेकडे वळून ) यले, नीनु यारु, मत्तु वब्बळे यल्ले होगुत्ती इदन्नु हेळुविया ?

वृंदा—बाबानों, मला कानडी नीटसं समजत नाहीं. मराठी बोललांत तर काय विचारतां तें समजेल.

अबदु०—हमाला मराठी चांगला मातार्डलिक्के बरु दिल्ला. तूं कोण मत्तु कुठ चालली हा सांगेल, तर फार छलो होईल. तुझा नांव येनु ?

वृंदा—माझं नांव घेऊन काय करावयाचं आहे तुम्हांला ? मी बैरागीण आहे. भिक्षा मागून पोट भरावं आणि यात्रा करीत जन्म घालवावा, हा माझा उद्योग. त्याप्रमाणें दक्षिणेंतील तीर्थं व पुण्यक्षेत्रं पहात चाललें आहे रामेश्वराकडे.

अब०—बरा झालें. ( फिरोझजंगाकडे बोट दाखवून ) ई नम्म गुरु बसब्यनवरूही रामेशराकडिगे जाणार. छलो सोबत सांपडली. नाऊ आदरू तिन्नसारखे भिकी बेडणारे जंगम आहों.

वृंदा—तुह्मी कोणी कां असनात ! मला घेऊन काय करावयाची आहे तुमची जात न गोत ? तुह्मी आपल्या मार्गानें जाणार, मी माझ्या रस्त्यानं चाललें आहें.

फिरो०—असा नहीं. तूं एकेली कसा होगती ?

ह्यंगसरीगे सोबत पाहिजे. हामाबरोबर चाल्ली तर तुला सोबत होईल, मत्तु नमगे चांगला वाटेल.

( संताजी, पिलाजी व येसबा आड राहून त्यांचें भाषण ऐकतात. )

**संता०**—पिलाजी, हे जंगम कोणी भामटे दिसतात. अशा ह्या जंगलांत एकट्या बैरागिणीला पाहून त्यांच्या मनांत कांहीं पापवासना उत्पन्न झाली असावीसें वाटतें. पाहूं आणखी काय काय होतें तें दुरून. प्रसंग आलाच, तर पुढें होऊं.

**पिला०**—व्हय धनीसाब. सरकारच्या मनांत आलेला तरूक अगदीं खरा. त्ये कोनी तरी ह्या जंगलांत एकट्या दुकट्या परवाशाला गांठूनशानी लुबाडून घेनार रामोशी असत्याल.

**येसबा०**—लुबाडन्याचा धंदा करणारासनीं असा जंगमाचा येस घेन्याचं कारण? पिलाजी, त्ये जंगमच असत्याल.

**संता०**—ऐका, ती बैरागीण काय ह्मणते पाहूं.

**वृंदा०**— बाबानों, जिथं देवानंच माझी जन्माची सोबत सोडवून एकटी हिंडण्याचा प्रसंग आणिला तिथं आतां मला दुसऱ्याची सोबत घेऊन काय करावयाची? त्यांतून तुह्मी जंगम. तुमची घेडगुजरी भाषा. सगळंच कांहीं मला चमत्कारिक दिसतं आहे.

**फिरो०**—चनबसय्या, इकी मारीमेलिन तेज मत्तु इकी मात इदरमेलिंद नोडिदरे इवळु बैरागीण खास अल्ला; इवळु मराठ्यार ह्यंगस इरबेकु. ई वेश तगोंडु

इवकु जिजिकडिगे नडदिद्धाळे, हीगे नन्न अनमास अदे. संताजी भेट्टि आगदिद्दरे सुद्धां ई शिकार छओ शिक्करे. अहाहा! येन इकी नोट्टु ?

पिला०—सरकार, आपून सांगाला, त्येच खर. ह्ये कोनी तरी मुसळमान असूनशानी आमचा तलास काडन्यापायीं चालल्याती! ह्येंच्या तावडींत ही गरीब बैरागीन कशी मिळाली कुनाला दक्कल? सरकार, ह्या गरीबिनीला मुसंड्यांच्या हातून सोडिवल्याइना आपुन न्हायी ऱ्हानार.

संता०—पिलाजी, तसें करावयाचें खरेंच; पण त्याला अजून अवकाश आहे. मुकाट्यानें ऐक. उतावीळ होऊं नको.

अब०—बाई, असा कसा बोलती? बोली कसाबी असली, तरी प्रवाशांनीं वाटमे एकमेकाला केळले पाहिजे. नम्म गुरु बसव्यनवरु बहळ छओ अदमी आहे. तुमी कायबी म्हटला तरी तुमाला तर्गोडल्यावांचून ते नाहीं जानार. ई जंगलामधें तुझांला चोर गांठला, तर कसा होईल सांग बाई ?

येस०—यौंरे न्वाडग्यांची अवलाद! पिलाजी, मी ह्ये कोनीबी गरीब जंगम असत्याल म्हनत होतों. गरीब बैरागीन बगुनशान उपटनार व्हय चोरानों! दावतो तुमासनी हात. (पुढें होऊं लागतो)

पिला०—(त्याला मागें ओढून) अरे चिप. धनीराव सांगत्याल तवां हूं!

वृंदा०—चोर ह्मणजे तुह्मांसारखेच असणार ना? भेटीत बापडे! पण कांहीं झालं तरी मी तुमच्या बरोबर नाहीं येणार. तुह्मी जंगम आहांत कीं कोण आहांत हें मी तुमच्या भाषणावरून ओळखलं आहे. तेव्हां मी बऱ्या गोष्टींनं आणि हात जोडून तुह्मांला सांगतें कीं, माझ्या नादीं तुह्मी लागूं नका. (रागानें लाल होते) मी एकटी असलें तरी अनाथ अबलांचा पाठिराखा देव समर्थ आहे, समजलांत?

फिरो०—अहाहा! ई शिट्टिनिंद बंदंथा मारी मोलिन गुलाबी बण्ण निन्न सौंदर्यके ह्यागे शोभिसुत्तद अंदी!! मेरेसरीखे सरदार ( जीभ चावतो ) नव्हे नव्हे ई बसव्या तुला सोडून यंदु होगलिकिल. आमचे संगात आली तर तुला सुख व्हईल. भीकी बेडुव श्रम कशाला करती? विश्वरानें तुला हा रूप दिला, तो बिलासम घालीव.

पिला०—सरकार, ह्मोर जाऊनशान त्या न्वाडग्याला विलास न्हाई पन कैलास दावतों आतांच्या आतां! हरामखोरा, अक्कल ठेवलियास कुठ!

संता०—अरे पशूच ते; त्यांना कुठली आली आहे अक्कल आणि बिक्कल! आपलें काम काय आणि करतों काय हें त्यांना कळतें, तर मराठेशाई त्यांच्या हातून कधींच नाहींशी होती. पण बादशाही संपत्तीचा धूर डोळ्यांवर आलेल्यांना विलासाशिवाय काय दिसणार! किंचित् थांब. ती बैरागीण काय उत्तर देते तें ऐकूं.

वृंदा०—( संतापून ) तुह्मांला सांगून ठेवतें कीं खबरदार! असले शब्द पुनः तोंडावाटे काढाल, तर जीभ हासडून प्राण देईन. अनाथ स्त्रियांचा छळ करणाऱ्या पुरुषांना शेवटीं नरकवास भोगावा लागतो, याचा मनाशीं पुरा विचार करा. मी घरदार टाकून बाहेर पडलें, ती सुखाकरितां नव्हे. तीर्थयात्रा करीत जन्माचें सार्थक करावें, हेंच माझें खरें सौख्य व हाच माझा दृढनिश्चय. तर, इतःपर माझ्याशीं एक शब्दही न बोलतां आपल्या वाटेनें चालते व्हा.

फिरो०—इंथा दरडावणीला भितो कोण! छलो गोष्टीनें ऐक. निन्नंथा रत्न कय्याग आपल्यावर सोडून झांग होगली? मेरी प्यारी! ( अंगास बिलगण्यासाठीं जवळ जातो. )

वृंदा०—( हातांतील किनरी उगारते व फिरोज मागें सरतो ) नीचांनो, संभाळा. देवा, या दीन अबलेचा अंत कोठवर पाहणार! आतां तुजवांचून माझी लज्जा रक्षण करणार दुसरें कोणी नाहीं.

संता०—( पिलाजी व येसबा यांस झाडींतच रहाण्यास सांगून आपण एकटाच पुढें येतो ) आलों; भिऊं नको. मी जिवंत असेपर्यंत तुजसारख्या यात्रेकरू वैरागिणीला दुष्टांच्या हातीं कधीं लागूं देणार नाहीं. ( फिरोजकडे वळून ) अरे, तुह्मी जंगम ह्मणवितांना! अंगाला राख फासून अशी नीच कृति? वाहवारे विरक्ति! अशा विरक्तीला देहांत प्रायश्चित्त मिळेल, हें पुरें ध्यानांत ठेवा. मुकाट्यानें रस्ता पकडल्यांत, तर

ठीक आहे. नाहीं तर काय होईल, हें माझ्यानें सांग वत नाहीं. बिचारी एकटी बैरागीण सर्वसंगपरित्याग करून तीर्थयात्रेंत देह झिजवीत असतां तिच्यावर हात टाकण्यास शरम कशी नाहीं वाटत!

**फिरो०**—अबदुल्ल, बहळ गुमैंद माताडुववनु इंव यारू? ईतनू हादी मेलिन याराद्दरू कळ्ळ इरबेकु. नम्मन्नु व्यदरिशी ईतनू तन्न क्यलस साधिसबेकु ई हेतुनिंद बंदिद्धाने. परंतु, नाउ यारु, मत्तु नम्ममेले कई यत्तिदरे ईतन परिणाम येन आदीतु, इद्दु इवनिगे गोत्त इल्ला. ( संताजीस ) अरे, तूं कोण! ई जंगलांतला रामोशी होय? आमाला व्यदरवून बैरागिणीला लुबाडावी अंती? नम्म उसाबरींत येशील, तर जीव कळ्ळकोळ्ळशीऽ. असा स्त्रीरत्न तुझेसारख्या तुडुगर कय्याग बिळू नये, ह्मणूनच आह्मीं ईकिगे आह्मांसंगती नेणार समजलास? जीभ लांब माडिद्रे छाटून टाकीन.

**संता०**—ठीक आहे. तुडुगर कोण व कोण कोणाची जीभ छाटतो हें आतां समजेलच. एखाद्या अनाथ स्त्रीचें दुसऱ्यापासून रक्षण करणारा मनुष्य तिला 'मेरी प्यारी' असें निर्लज्जपणें कधीं ह्मणेल काय? तुह्मी दोघे व मी एकटा, ह्मणून तुह्मांला माझ्या हातून काय होणार अशी घमेंड असेल. पण, माझें नव्हे माझ्या बापाचें नव्हे ह्मणून गांवावर फुकट खाऊन मोंगल सेनेंतील सरदाराप्रमाणें तुंद पडलेल्या अध्ययनवरू बोकोबांचें गुरकावणें किती किमतीचें असतें, हें ह्या किडबिड जोशाला चांगलें माहीत आहे. ( बैरागीण कांपत उभी

असलेली पाहून ) बैरागीणी, अशी भीतीनें कांपू नको. मी या वेळीं न येतों, तर मात्र या हराम खोरांनीं तुझी गत काय केली असती नकळे! आतां हा संतु तुझ्याजवळ असेपर्यंत कोणीही तुजकडे पापदृष्टीनें पाहूं शकणार नाहीं. स्वस्थ ऐस.

बहि०—तुह्मींच माझे जन्मदाते मायबाप. सती द्रौपदीचा धांवा ऐकून संकटाचे वेळीं ज्याप्रमाणें श्रीकृष्णानें धांव घेतली, त्याप्रमाणें तुह्मीं येथें आलांत; तेव्हां तुह्मांला मी देवाच्या ठिकाणीं समजतें. आतां मला कशाचीही भीति नाहीं.

फिरो०—चनचसच्या, नोडती येनु? हरामखोर कोण इदु ई मिकी बेडुववनिगे छल्ले दाखीव. अल्लीतनक मी हे बैरागिणीची समजून करितो. किडबिड्याला पाहून हे बिथरली!

अब०—हौदरी. इवन समाचार मी लेतो. ( संताजीच्या आंगावर धावून ) अरे भिकारडा, दूर जातो कीं कुडली दोन धक्का!

( दोघेही एकमेकांच्या आंगावर धांवतात व कुस्ताकुस्ती होऊन अबदुल खालीं पडतो आणि संताजी त्याच्या छातीवर बसून मुष्टिमोदक चारतो. )

फिरो०—( बैरागिणीशीं लगट करून ) मेरी प्यारी! असा क्यौं करते? माझ्यासंगात आली, तर घी शक्कर खाशील. एक मिठा! ( खांद्यावर हात टाकावयास जातो तों ‘ मेलों मेलों या अल्ला ’ अशी अबदुल्लाची आरोळी ऐकून घाबरतो व मागें फिरतो. )

फिरो०—( अबदुल्लाकडे वळून ) येन आतु अबदुल्ल? नहीं नहीं चनबसय्या!

संता०—(अबदुल्लाच्या छातीवरून उठून ) अबदुल्ला तर संपलाच; आतां त्याचा साथीदार गुबदुल्लाची काय वाट होते पाहूं!

फिरो०—अरे बेवकूफ, ( भगव्या कफनीखालीं झांकलेली तलवार बाहेर काढून ) ई समशेर नोडिदिया! नन्न सोबतीला चीत केलास, पण तुझा काय अवस्था होईल नोड आतां! ( अबदुल्ला मेला कीं जिवंत आहे तें पाहण्याकरितां जवळ जातो व तो रगत ओकलेला पाहून संतापतो.) बे सुअर, तेरा गमजा अभी देखताहूं. ( तलवार उगारून संताजीच्या अंगावर धांवतो. ) मै कोन है, तुम जाना नहीं.

संता०—( आपल्या कमरेसभोंवतीं गुंडाळलेली तलवार काढून ) सर्व कांहीं जाणलें आहे. कोण कोणाचा गमजा उतरतो, तें आतां तूंच पाहशील. अंगांतील धमकीप्रमाणें तलवारींत कांहीं पाणी असेल तर दाखीव. चल, प्रथम पट्ट्याचे दोन हात करूं. व्यर्थ वल्गना नको.

फिरो०—अच्छा, देखताहूं.

( दोघेही पट्टा खेळूं लागतात. )

येसबा—( झाडींतून ) पिलाजी, त्या न्वाडग्यान आपल्या धनीसाबासंग लइ वाडोळ दम धरलाया नव्हं-का? कसा परसंग येईल कुनाला ठाव! तंवा आपुन होर जाऊं चल.

पिलाजी—आमच्या धनीसाबावर परसंग! असल शंभर न्वाडग आल, तरीबी न्हायी त्ये दाद देनार. समशेर हातामंदी असल्यावर धनीसाबांच्या झोर काळबी लंगडा!

( पट्टा खेळतां खेळतां संताजी फिरोजजंगाच्या मांडीवर वार करून त्याला खालीं पाडतो, )

संता०—बस झालें कीं घेऊं पुरता प्राण? नको; तूं जिवंत राहिलास तरच गरीब हिंदु बैरागिणीच्या पातिव्रत्यावर हल्ला केल्याचा परिणाम काय होतो, याची तुला व तुझ्या जातभाईंना नेहमीं आठवण राहील.

फिरो०—याअल्ला! परवरदिगार!! अब मै तो इस तर्‍हेसे जखमी होकर लाचार होगया हूं; जो कुच कहनेका वो कहलेव. ( जखमेच्या वेदना होऊं लागल्यामुळें कण्हतो ) मेरी जान एकदफा निकल गयी तो बहोत अच्छा होगा. याअल्ला! कैसा वख्त लाया!!

संता०—पिलाजी, याची जखम बांधून त्याला पलीकडल्या झाडाच्या सांवलींत नेऊन ठेवा. आह्मीं या जवळच्या गांवीं गेलों, ह्मणजे एखाद्या ह्याच्या जातभाईला सांगूं; ह्मणजे तो याला आपल्या घरीं घेऊन जाऊन हा बरा होईपर्यंत याला अन्नपाणी देईल. ( बैरागिणीकडे वळून ) बाई, तुह्मांला कोणीकडे जावयाचें?

बहि०—माझे प्राणदाते तुह्मीच. तेव्हां मला एखादी सोबत मिळेपर्यंत तुह्मांबरोबर यावं असं माझ्या मनांत आहे.

**संता०**—बाई, आह्मांबरोबर येऊन तुमचा पल्ला यावयाचा नाहीं. कारण, आह्मी आज येथें तर उद्यां येथून पांचदहा कोसांवर असणार. शिवाय आतां कर्नाटकांत मुसलमानांचा सुळसुळाट फार माजण्याचा संभव आहे. तेव्हां जवळच्या खेड्यापर्यंत आह्मी तुह्मांस नेऊन पोंचवितों. चांगली सोबत मिळेपर्यंत येथेंच तुह्मी रहा. ( पिलाजीकडे वळून ) पिलाजी, झाली कीं नाहीं अद्याप जखम बांधून ? येसबा, उचला त्याला. येथें बोलत राहिलों तर पुढला आपला पल्ला झेंपणार नाहीं चला. ( फिरोजजंगास उचलून सर्व निघून जातात. )

---

## प्रवेश ५ वा.

### स्थळ—गुत्तीजवळच्या जंगलांतील मार्ग.

( खंडोपंत व परशुरामपंत प्रवेश करितात. )

**खंडो०**—पंत, आपल्याला आज गुत्तीहून निघतांना बराच दिवस आला होता. तरी पण सहा तासांत पुष्क-ळ मजल आलों ह्मणावयाचें. येथून मुक्कामाचें स्थळ आतां जवळ आहे; तेव्हां घोडे चालीवर धरिले तरी हरकत नाहीं. असाच पल्ला झेंपला तर धनाजीरावांची छावणी आपण तिसरे दिवशीं गांठूं.

**परशु०**—चिटणीस, आतां धनाजीरावांना भेटण्यास एखादा दिवस जास्तकमी लागला तरी हरकत नाहीं. गुत्तीला आलेली कामगिरी फत्ते झाली हें मोठें मिळवि-लें. बहिरजीनें धनाजीरावांस मिळून त्यांना साहाय्य करण्याचें जरी नाकारिलें, तरी विठोजी चव्हाण, हिंम-

तबहादूर व आपण एकोप्यानें वागून बेंगळूर व गुत्ती-च्या बाजूनें शत्रूंची रसद किंवा सैन्य जिंजीकडे चढूं देणार नाहीं, असें अभिवचन दिलें. तेव्हां या प्रसंगीं हा त्याच्या मनाचा मोठेपणाच समजला पाहिजे. कारण, बंधूच्या अपमानाबद्दल मनांत दंश धरून तो मोंगलां-ना मिळेल असें प्रत्येकाला वाटलें होतें. पण, कांहीं झालें तरी रामचंद्रपंताच्या विचाराबाहेर आपण कधींही वागणार नाहीं, हे त्याचे स्पष्ट उद्गार खरोखरच प्रशं-सनीय होत.

खंडो०—पंत, रामचंद्रपंताचें लिहिणें किती जोमदार, किती लनिपणाचें व दुसऱ्याच्या हृदयाला कसें पाझर फोडणारें असतें तें पाहिलेंतना? त्यांच्या पत्राला बहि-र्जीचसा काय, पण दुसरा कसलाही दुरभिमानी व तामसी स्वभावाचा मनुष्य असता, तरी तो मान दिल्या-वांचून राहताना. रामचंद्रपंतांच्या आंगचे गुण, कोणा-लाही विषाद न वाटण्यासारखें त्यांचें वर्तन, त्यांचें मुत्सद्दी धोरण व असेल ती सामुग्री घेऊन उत्तम रीतीनें काम करण्याची हातोटी हीं पाहिलीं म्हणजे प्रल्हादपंतां-ना झांकावें आणि त्यांना काढावें अशीच त्यांची योग्यता आहे.

परशु०—प्रल्हादपंतांमागें त्यांच्यासारखे स्वराज्याचा भार वाहणारे भक्कम खांब आज उभे आहेत म्हणून तर सगळ्या गोष्टी. नाहींपेक्षां असल्या बिकट प्रसंगीं घसरलेली बाजू सांवरून महाराजांना व पदरच्या मंडळींना धीर देणारे दुसरे कोण आहेत? रामचंद्र-

पंतांचा ओढा पूर्वीपासून संताजीकडे फार असल्यामुळें मला तर अशी भीति वाटली होती कीं, या वेळीं सर्वत्र बेदिली उत्पन्न होणार. परंतु तें कांहींएक मनांत न आणतां हिंदुपदपादशाहीवर दृष्टि देऊन स्वराज्याचें यश रक्षण करण्यासाठीं त्यांनीं कंबर बांधिली, ही सामान्य गोष्ट नव्हे.

**खंडो०**—हें काय विचारावें! ( उजवीकडे पाहून ) बरें; पण पंत, जपून पावलें टाकीत, भगवीं वस्त्रें पांघरलेला हा या बाजूनें कोण येत आहे? हा पहा तो अगदीं जवळ आला. आह्मीं बोलण्याच्या नादांत असल्यामुळें आमचें लक्ष जरी त्याच्याकडे गेलें नाहीं तरी त्याचें सारें लक्ष मात्र आमच्या बोलण्याकडे होतें असें वाटतें.

**परशु०**—तो कोणी श्रावकपंथी जति असावा. तो खालीं दृष्टि देऊन जपून पावलें टाकीत येत असण्याचें कारण तुह्मीं ह्मणतां तें नव्हें. "अहिंसा परमो धर्मः" हें त्यांच्या धर्माचें मुख्य तत्व. ह्मणून पाया खालीं एखाद्या जीवजंतूची हत्या होईल या भीतीनें श्रावकधर्मी सन्यासी नेहमीं जपून चालतात. त्यांच्या हातामध्यें जो मोराच्या पिसांचा कुंच असतो तो जमिनीवरील जीवजंतु झाडून मग पाऊल टाकावें अशाकरितांच असतो.

( जति प्रवेश करितो. )

**जति**—( उश्वास टाकून ) अरहंत, अरहंत! ही यात्रेची दगदग वाटेच्या त्रासामुळें आणि अविंधांच्या भीतीमुळें अगदीं नकोशी झाली आहे.

परशु०—जति महाराज, आह्मां प्रापंचिकांबरोबर बोलण्यानें आपल्या ह्या आश्रमाच्या नियमांचें उल्लंघन होत नसल्यास आपण इकडे कोणीकडे जाणार हें आह्मांस एकवाल, अशी आशा आहे.

जति—अकारण आह्मी कधीं कोणाशीं बोलत नसतों. परंतु तुह्मी कोणी या प्रांताचे अधिकारी दिसतां; तेव्हां तुमच्या प्रश्नाचा जबाब न देणें ह्मणजे अधिकाराची अमर्यादा झालीसें होईल; ह्मणून जबाब देणें भाग आहे. आह्मी फिरत फिरत इकडे कर्नाटकामध्यें आलों आहों व आह्मां श्रावकपंथी लोकांचें प्रसिद्ध देवस्थान जें बेळगूड तें इकडेच आहे. तेथें पौर्णिमेस मोठी यात्रा भरत असते; तेव्हां तिकडे जाण्याचा विचार आहे.

परशु०—चिटणीस, यति महाराजांचे पूर्ववय असतांही संसारसुखाचा त्याग करून पुण्यक्षेत्रांचें दर्शन घेत जन्माचें सार्थक करण्याविषयीं यांच्या ठायीं अशी बुद्धि उत्पन्न झाली हें तरी पूर्व पुण्यच समजलें पाहिजे. पूर्व संस्काराशिवाय पारमार्थिक सुखाचा लाभ मनुष्याला होणें नाहीं. तसें नसतें तर सर्वच मोक्षाचे अधिकारी झाले असते. आह्मांसारख्या संसारसागरांत गटंगळ्या खातां खातां बुडून मरणाऱ्या लोकांचीच संख्या जगावर फार.

खंडोपं०—पंत, संसार तरून जाण्यास प्रपंचाचा त्याग करून यतिवेष घेतला पाहिजे किंवा संन्याशी बनलें पाहिजे असें कांहीं नाहीं. प्रपंचांत राहून देखील तो तरतां येतो. महा सत्पुरुष तुकाराम संसारात राहूनच

मुक्त झाले ना? आपापल्या योग्यतेप्रमाणें व खऱ्या निष्काम बुद्धीनें प्रपंचांतील कामें बजावून जो ईश्वराला शरण जातो तोच खरा तरला असें समजलें पाहिजे. भगवंतांनीं गीताद्वारें अर्जुनाला जो उपदेश केला आहे त्यांत असें स्पष्ट सांगितलें आहे कीं, संसारांत राहून कर्मे केल्याविना मनाची शुद्धि होत नाहीं; मनाच्या शुद्धि वांचून ज्ञानप्राप्ति नाहीं व ज्ञानप्राप्तिवांचून मोक्ष नाहीं. ह्मणूनच ॥ प्रपंच साधुनि परमार्थाचा लाभ जयानें केला । तो नर भला भला ॥ असा समर्थांनीं जगांतील मुमुक्षुजनांला उपदेश केला आहे. नाहींपेक्षां संन्यास घेतला किंवा भगवीं वस्त्रें परिधान केलीं आणि पापवासना पूर्वीपेक्षां जास्त बोकळूं लागल्या तर त्यांत पुण्यतें कसचें पदरीं पडणार? मनांत लोकांच्या माना विश्वासघातानें कशा कापूं, असले नीचपणाचे विचार घोळत असावयाचे आणि तोंडानें नारायणनामाचा घोष चाललेला असावयाचा असे बोकेसंन्याशी आपल्या पाहण्यांत काय थोडे आहेत? तसला प्रपंचत्याग किंवा संन्यास विशेष पातकांना मात्र कारण होतो.

जति–( घाबरून ) छे; मला आतां आपल्याबरोबर बोलत राहण्याची सवड नाहीं. हा पहा सूर्योदयाचा नव्हे नव्हे सूर्यास्ताचा समय अगदीं जवळ येत चालला. मला दिवस मावळण्यापूर्वीं एखादें वस्तीचें ठिकाण गांठलें पाहिजे. कारण आह्मां श्रावकपंथीं यतींना सूर्यास्तानंतर प्रवास करण्यास आमच्या शास्त्राची अनुज्ञा नाहीं. यासाठीं मी तुमचा निरोप घेतों.

( सट्कन घाईघाईनें निघून जातो. )

खंडो०— पंत, हा यति एकदम इतक्या लगबगीनें बाणासारखा निघून गेला याचें कारण काय असावें बरें? बोकेसंन्याशाचें नांव काढतांच त्याची वृत्ति अगदीं कावरीबावरी दिसूं लागली होती. तो गांगरून गेला हें तर त्याच्या भाषणावरूनच दिसून आलें. त्याच्या भगव्या पोषाकांत कांहीं भामटेगिरीचा प्रकार असावा खास.

परशु०—तसेंच कांहीं केवळ ह्मणतां येत नाहीं. कारण तो आमच्याशीं बोलत राहिल्यामुळें त्याला सूर्यास्ताचें प्रथम भान राहिलें नाहीं. पण, मग दिवस अगदींच मावळण्याची वेळ आली असें पाहून आतां पुढें कोठें जावें आणि कोठें वस्ति करावी वगैरे अडचणी मनांत आल्यामुळें तो गोंधळून गेल्यासारखा झाला असावा; दुसरें काय? आपल्यालाही आतां डोळ्या उजेडींच जवळचा गांव गांठला पाहिजे. चला.

( दोघेही निघून जातात. )

---

## प्रवेश ६ वा.

---

स्थळ—तेंच.

( जति प्रवेश करितो. )

जति—( तोंडावरचें वस्त्र काढून घेऊन ) माझें नशीब सव्वा हात लांब खरें. नाहीं तर वाघाच्या जबड्यांतून

कसचा सुटणार होतों! माझी नसली तरी वाडवडिलांची पुण्याई जबर यांत मुळींच संशय नाहीं. महा धूर्त आणि चोराचीं पावलें ओळखणाऱ्या त्या खंडोपंताच्या तोंडून 'बोके संन्याशी' एवढीं अक्षरें निघालीं मात्र; आणि माझ्या मनाची काय स्थिति झाली ती एक त्या ईश्वरालाच माहीत. सर्वांगाचें पाणी मरून गेलें. हा हणमंतराव कसल्याही प्रसंगीं फेंफें करणारा मनुष्य नव्हे; परंतु तेव्हां काय झालें तें माझें मलाच कळेना. असो; कांहीं झालें तरी प्रसंग निभावून गेला. ईश्वराच्या मनांत या हणमंतररावाच्या हातून अद्याप पुष्कळ महत्कार्यें करवावयाचीं आहेत यांत संशय नाहीं. ( चपापून मागें पाहतो ) अरे, पण हें उत्तरेच्या बाजूला घोड्याच्या टापासारखें काय ऐकूं येतें बरें! माझा संशय येऊन कोणी मला पकडण्याकरितां मागून येत तर नसेलना? छेः उगीच मनाचा संशय तो! ( उराला हात लावून ) ही उरांत भरलेली धडकी अद्याप गेली नाहीं. हिंदु किंवा मुसलमान यापैकीं कोणीही माझ्या वाटेस जाऊं नये व कोणालाही माझा संशय येऊं नये ह्मणून मी हा जैनांचा जति बनलों; पण त्या कारस्थानी खंडोबानें मला ओळखिलें किंवा काय नकळे! खंडोबा, किती तरी तूं मसलती करशील! स्वराज्याविषयीं तुझ्या ठिकाणीं कोण्या प्रकारची तरी हावही! स्वराज्य झालें किंवा बादशाही अम्मल झाला, तरी तुला दोन्ही गोष्टी सारख्याच. भोंसले कुळाचा उत्कर्ष झाला ह्मणून तुला कोणी राज्य का देणार आहे? तुझी काय आणि मी काय; चाकरी करून भाकरी खावी एवढाच आमचा

अधिकार. चाकरीच करावयाची, तर मराठ्यांची काय आणि मोंगलांची काय सारखीच. पण हें बुद्धिहीनांना कसें कळणार ! खंडोबाची व परशुरामपंताची गांठ पडल्यानें जरी प्रथम जीव चरकला, तरी आतां एका कामांत दोन कामें साधण्याचा लाग आला आहे. खंडोबा धनाजीरावांच्या छावणीपर्यंत जाऊन मग जिंजीस जाणार. तेव्हां आधीं त्या लुच्चाची व्यवस्था लावण्याकरितां मला येथूनच परत अरुणाचलापर्यंत गेलें पाहिजे. तेथें कोंडो विठ्ठलाकडून खंडोबाला वाटेंत चतुर्भुज करवून मोंगल फौजदाराच्या स्वाधीन करवि- विण्याची तजवीज केली कीं, बहार उडाली ! गुप्तीचा कार्यभाग मागून करितां येईल. ( तोंडावरील फडकें बांधूं लागतो ) किती वेडेपणाची धर्मसमजूत ही ! श्वासो- च्छ्वासाच्या योगानें जीवजंतु मरतील व हत्या होईल, ह्मणून हें वस्त्र तोंडावर बांधावयाचें ! या वेडेपणाला काय नांव द्यावें ? पण या वस्त्राच्या योगानें माझें आय- तेंच एक मोठें काम झालें आहे. माझ्या मनांत घोळत असलेल्या कारस्थानांचें प्रतिबिंब चर्येवर उमटून त्या- च्या योगानें माझा कोणाला संशय येईल ही भीति बाळगावयास नको. बरें; आतां जवळच्या खेड्यांत रात्रीची वस्ति करून उजाडण्यापूर्वीं अरुणाचलाचा रस्ता सुधारावा.

( निघून जातो. )

---

## प्रवेश ७ वा.

### स्थळ—नवलगुंदाजवळचे रानांतील मळा.

( कोंडाजी प्रवेश करतो )

**कोंडाजी**—तुक्या, अर तुक्या, ह्योका कवाचान गुडगुडी आनतूयास न्हवर?

**तुक्या**—जी व्हय. मगा गुडगुडी आनायापायी गेलो इकत्यामंदी उसांतल पानी परताया चांग्यान हटकल तंवा ग्येलो तकड, अन काय करू जी? आतां घेऊन शान आलोच बगा. ( गडबडीनें पडद्याच्या आंत जाऊन परत येतो. )

**कोंडाजी**-अर, गुडगुडी आनतुयासना? मग इकतस जाऊन कां परतलास? तुक्या, आज तुझ ध्येन गेलया कुनीकड? एकांदी फटाकडी तर.....

**तुक्या**— धनीसाब झातार झाल तरीबी असली थट्टा न्हाई इसारल अजून! बाईसाबानीं इचाराया सांगितल व्हत, आन सांच कारड्यास काय करू झणून. पण त्ये धनीसाबासनी इचारायच इसरूनशान ग्येलो तसाच निगून. इकतासा गेल्यावर आटव झाली म्हुन आलो तसाच परत.

**कोंडाजी**—तुक्या, घरामंदी आधी भाकर कराया सांग. इच्याभन आज दिसाचदिस उनामंदी फिरूनशान जीव गेलाया अक्शी दमून. आन भुकातर लई लागल्याती. तंवा भाकरीसंग आळण नसल तरीबी

चालल. दुपारची लसनीची चटणी हाईच. जा, आधी गुडगुडी घेऊन ये; मग समद.

तुक्या—हां चाललोच. एकदां इसरून आलो ह्मनून आतां न्हायी इसरनार. ( पडद्याच्या आंत जाऊन पुनः परत येतो ) धनीसाब, आकाच्या गांवच पावन आल्याती. हकडच लावून देऊ न्हवका?

कोंडाजी—कोन, जावजीराव पाटील आल्याती? जा, त्यासनी मळ्यामंदीच हटकलया म्हुन सांग. पन ल्योका, गुडगुडी आनायची टाकून तूं फिरफिरून मागारी येनार तरी किति दा?

तुक्या—न्हाई, ह्यो निगालोच बगा. ( जातो )

( जावजीपाटील प्रवेश करतात. )

कोंडाजी—( उठून ) रामराम जावजीपाटील! पूर्वी काइबी सुनशा नसतां आज कुनीकड ही सवारी? या, बसा.

जावजी—( रामराम करून बसल्यावर ) भेटूनशान लई दिस झाल व्हत, आन थोड नाजूक कामबी पडल; तंवा याव ह्मटल नि काय!

( तुक्या गुडगुडी घेऊन येतो. )

कोंडाजी—आदी पावन्यासनी द्येकी ल्योका!

जावजी—न्हाई; तुमीच आदी वडा.

कोंडाजी—अस कस व्हईल? आपल्या घरीं पावन आल ह्मंजे त्येंचा आदीर क्येला पाहिजे न्हव? तंवा तुमचा मान आधी.

( दोघेही गुडगुडी ओढतात व तुक्या ती घेऊन जातो )

**जावजी**—कायवराव, औंदा गतसाला परास मळ्याच जितराप ज्यास दिसतया. औंदा म्हेनत लई झालीया वाटत ?

**कोंडाजी**—व्हय, गतसाला परास औंदा ब्येस हाय खर; पन पाटील, इकती म्हेनत करूनशान तरी सार जितराप घरीं येईल हाऽऽच हाय कुट ह्या दिसामंदी ? संताजीराव मराठ्यांची छावनी सोडून गेल्यापुन कर्नाटकामंदी म्वाडम्यांनीं अकशी धुमाकुळ मांडलाया. त्येंची धाड आलीकीं समद्या पिकाच आन घरादाराच वाटोळ! तंवा ह्य म्हेनत करनबी नग, आन म्वाडग शेतांत शिरूनशान हिरव पीक चरारा कापून नेत्याली त्ये बगनबी नग. काय सांगू राव, जीव कसा अगदीं तरासून गेलाया. ह्ये म्वाडग न्हाइस व्हत्याल तंवा पीक आन पानी ! जेबलेल अनबी न्हाई सुखास येत आन इवाप तर कशीती न्हाईच.

**जावजी**—कोंडाजीराव, हकडबी त्येंचा सुळसुळाट हैच म्हना ? हामी समजत व्हतो, की त्येनी आमच्या गांवावरच धाड घातलीया. आज ध्यान म्हैन झाल; मुसळखान की जातंखान कोनसा म्वागल फौजदार चारशे लोक संग घेऊनशान आमच्या गांवच्या सीमबरच तळ देऊन बसलाया. त्येन दान जमवायापायीं आजूबाजूच्या खेड्यापाड्यामंदी इकता जुलूम चालिवलाया कीं काई सांगता न्हायी येत बगा. इच्याभन त्येच्या शिपायांनीं माळनीच्या पाटींतलबी दान वतून

न्हेव व्हय! त्येनी आमच्या गांवावर दरोडा घातल्या-वेळी गांवचगांव मिळूनशान जंवा च्वापच्वापून एकेकाच डोकस फोडलं तंवापून त्ये जरास नरम आल्याती. त्ये मुसांड वगड वगड वराडत्याल आन भेदरावत्याल; पन खरंच सांगू कोंडाजीराव, त्येंच्या सारखी भ्याड जात न्हायी बगा कंची.

कोंडा०—पाटील, आपुन ह्मनता त्ये अक्सी खर. पन संतजीराव घोरपड आन धनाजी यांच्या मंदी वैर माजल ही गोष्ट लई वंगाळ झाली बगा. त्यो वाघावानी सरदार मराठ्यांच्या छावनींत व्हता तवर न्वाडग चळा-ळा कापत व्हत. पन आतां त्ये लई चढून गेल्याती.

जाव०—काय सांगू राव! त्यो झुल्फिकरखान६०००० फौज घेऊनशान जिंजीच्या किल्ल्याला वेढा घालन्या पायी गेलाया ह्मणून बोलत्याती. तंवा आता ह्योर परसंग लई कठीन दिसतूया. सवराज जर का येकदा म्बाडल आन ह्याराज शत्रूंच्या हातीं लागलं, तर ह्योर ह्ये न्वाडग आमची समदी जात बाटावयाल आन दुर्देसा दुर्देसा करत्याल. ह्मनून धनाजीरावाच्या फौज मंदी शिपायगिरी पत्करून सवराजच याश राखन्या पायी म्वांगलाशी लढई द्यावी आन त्येंची खवाड तोडावी, असा आमच्या परांतांतल्या कैक ह्मराठ गड्यांनीं ठ्योत केलाया. आपुनबी त्येंच्यासंग निघनार. तुमचा कसा काय इचार?

कोंडाजी—आमापुनबी सवराजाची थोडी फार चाकरी घडावी अस लई दिसापासून मनांत हाय; पन

एकट्यान कस जाव ह्येच्या इचारांत व्हतो. मी निघनार ह्ये समजल, तर आमच्या पांढरींतलबी कैक ह्मराठ गडी आमासंग निगाया योका पायावर तयार हायती. न्वाडग्यासनी आमची मर्दुमकी दावायचा असला परसंग पुना कदी येनार हाय व पाटील? ह्मारांजांच राज व्हायल तर समदी गंमत; न्हाईतर आमच निन यल्थच; खर की न्हायी बोला राव!

जावजी—ह्ये काय इचारन कोंडाजीराव? ब्येस ब्येस बोलत्यात. पन राव हकड बगा ह्यो काठी टेंकीत ह्मातारा गडी कोन बर हकडच येतूया?

( शामभट्ट प्रवेश करितो. )

शामभट्ट—रामराम गळेकरी दादा. मळयाचे मालक तुह्मीच असाल? तेव्हां रात्रीची रात्र मळयांत वस्ति करण्यापुरती जागा मिळण्याची सोय होईल काय? संध्याकाळ झाल्यामुळें वाट दिसेनाशी झाली आहे. ह्मणून जागा मिळाल्यास वस्ति करावी ह्मणतो. जीव कसा अगदीं दमून गेला आहे. हरे कृष्ण, वासुदेव वासुदेव; सच्चितानंद!

कोंडाजी—ह्मातार दादा, जागा म्हाप हाय. तुमा सारख्या ह्मातान्या बिरामनाला उतराया नग कोन ह्मनल?

जावजी—खुशाल न्हावा. पन, भटजीदादा आपुन आला कंच्या गावासन आन हकड जानार कुनीकड!

शामभट्ट—( खांद्यावरील पडशी खालीं ठेवितो व तपकिरीची चिमूट भरून घेऊन ) बाबानों, तें घेऊन

काय करणार तुह्मी? कर्म लागलें आहे ह्या ह्याताऱ्या शामभट्टाच्या पाठीला; तेव्हां तें नेईल तिकडे गेलें पाहिजे; दुसरें काय? हें दुःख बघण्यापेक्षां ब्राह्मण कुळांत जन्म झाला नसता तर फार बरें होतें! पूर्वी ब्राह्मण कुलांत जन्म होणें हें मोठें पुण्य समजत. पण आतां त्यासारखें पाप दुसरें कोणतेंच नाहींसें झालें आहे.

**जावजी**—भटजीदादा, असं अकशी भिरामिनाच्या कुळावर उठाया झालं तरी काय?

**कोंडाजी**—पाटील, व्हनार काय? मुलाची मुंज न्यायी तर लगीन करायच असल भटजींच्या मनामंदी; पन पैसा नसलं जवळ, ह्मनून काबल असयाल झाल. दुसर हाय काय? ह्या दिसामंदी देसावरी तरी कोन घेनार?

**शाम०**—अहो, कुठल्या मुंजी आणि कुठलीं लग्नें घेऊन बसलां आहांत तुह्मी! मोंगलांच्या तरवारीशीं सगळ्यांची लग्नें लागण्याची आली आहे वेळ, आणि तुह्मांला ह्या गोष्टी आठवतात तरी कशा? आजकाल मुसलमानांनीं या कर्नाटकांत हिंदु प्रजेची आणि हिंदुधर्माची काय दुर्दशा मांडली आहे, हें तुमच्या गांवींही नाहींसें वाटतें! काय सांगू ब्राह्मणांची दुर्दशा! त्या शिखानष्टांनीं माझ्या घरादाराचा पाटावरवंटा करून सोडला आणि एकुलता एक पोर होता त्यालाही बाटवून नेला आपल्या छावणींत त्या राक्षसांनीं ओढून! तेव्हां उघड्या डोळ्यांनीं हीं अशीं दुःखें पाहण्यापेक्षां देवानें माझे डोळे झांकिले असते तर काय वाईट होतें?

शिव शिव शिव ! नाहीं, आतां ब्राह्मण्य कसलें ते राहिलेंच नाहीं

जावजी—अऱ्या अऱ्या अऱ्या ! न्वाडग्यांनीं गरीब ह्मातार्‍या बामनाची अशी गत केली कायव ? लई लई वंगाळ ! तुमच्या पांढऱ्या केसाकड बगूनशान तरी त्या न्वाडग्यांना दया यावी व्हती. पन त्यांची अवलाद कसली कुत्रं ! ग्वाष्ट लई लई वाईट झाली खरी; पन आतां ह्मोर तुमी काय करनार ?

शाम०—काय करणार ह्मणून विचारितां ? अहो, त्या शिखानष्टांची पाळेंमुळें खणून टाकण्याकरितां ब्रह्माण्ड पालथें घालावें लागलें तरी हरकत नाहीं. पण ह्या ह्मातार्‍याला नाहक छळल्याबद्दल सूड उगवीन तरच हा नांवचा शामभट्ट. गुप्तीहून बहिरजीराव मोठी फौज घेऊन मोंगलांशीं लढण्याकरितां एक दोन दिवसांत जिंजीस जाणार असें मीं ऐकलें आहे. तेव्हां त्यांच्या बरोबर हा ह्मातारा जिंजीस जाणार आणि मोंगलांशीं लढून त्यांना दांतीं तृण धरावयास लावणार समजलांत ? माझें वय ह्मातारें झालें तरी ईर्षा नाहीं ह्मातारी झाली ! दहा पांच अविंधांना लंबे करीन, तेव्हां हातची तलवार खालीं ठेवीन.

कोंडाजी—ह्मातारदादा, तुमी हा सारा ब्योत केलाया खरा. पन, मी ऐकल्या भलतच. बहिरजीराव आन् संतानीच लोक मोंगलासनी जाऊन मिळनार ह्मन ! ह्मारानांच्या मनामंदी संतानीरावाबद्दल वंगाळ बुद्द आल्यापायीं संतानीराव ह्मराठ्यांची छावनी

सोडूत कोनीकड गेल्याती त्येंचा पत्ताची न्हाई. तंवा बहिरजीराव आ ां ह्मारा जासनी कस चांगल ववयाल ?

शामभट्ट—पाटील, तुह्मी काय बोलतां हें ? घोरपड्यांच्या कुळांत उत्पन्न होऊन मोंगलांची चाकरी ? अशी गोष्ट कालत्रयींही होणार नाहीं. हिंदुधर्माचा आणि स्वराज्याचा अभिमान त्यांना नाहीं असें कसें होईल ?

जावजी—कस ह्मंजे ? संताजीरावाच सेनापतिपद काढून घेन्यापायीं त्येंच्याशीं वैर धरून ह्मारा जानीं इक्का परसंग आनला. तंवा तुमीच सांगा, कोनाच सवराज अन हाय काय ह्मातारदादा ! त्यापायीं मी ह्मनतो, तुमी गुत्तीस जाऊनशानची यरुथून.

शामभट्ट—( दांडा हापटून रागानें ) मोठे आले आहेत उंटावरले शहाणे स्वराज्याची निंदा करणारे ! मी ह्मणे " असं ह्मंतो आणि तसं ह्मंतो " झक मारता तुह्मी ! बहिरजीरावाच्या मनांत स्वराज्याविषयीं तिरस्कारबुद्धि कधींही उत्पन्न होणार नाहीं. आणि जर कदाचित् झालीच असली, तर मी ब्राह्मण व ते मराठे असले तरी त्यांच्या हातांपायां पडेन, साष्टांग नमस्कार घालीन आणि गळीं पडून विनंति करीन कीं संताजीरावाच्या मानहानी संबंधानें कोणाची जरी चूक असली तरी हा प्रसंग निभावून गेल्यावर त्याविषयीं मागाहून विचार करितां येईल. घरगुती भांडणें मनांत धरून दुही माजविण्याची ही वेळ नव्हे. या वेळीं सर्वांनीं एकदिल होऊन स्वधर्म व स्वराज्य यांजवर कुऱ्हाडीचा घाव घाल-

णाऱ्या मोंगल शत्रूंचें पुरें शासन केलें पाहिजे. असें न होईल तर हिंदु हें नांव देखील दुनियेंत राहणार नाहीं, असा हा प्रसंग आहे. इतकें सांगितल्यावर त्यांचें मन वळल्यावांचून खचित राहणार नाहीं.

कोंडाजी—अस मन वळाया त्ये का बामन लाग-ल्याती व्हय? म्हाराजांनीं जर सवराजापायीं परान देनाऱ्या संताजीरावांना आपल्या छावनींतून हाकूनशान लावल, तर त्येंच सासन करन्यापायीं बहिरजीराव म्वांगलांना मिळाल्यावांचून कस ऱ्हातील हे तुमीच बोलाना भटजी!

शामभट्ट—अहो, बोलतां काय? प्रत्यक्ष ज्यांच्यावर प्रसंग आला आहे ते संताजीराव बादशहा विनवीत असतां ही जर त्याची सरदारी पतकरण्यास तयार झाले नाहींत, तर त्यांचे चिरंजीव किंवा बंधु स्वराज्याचा नाश करण्यासाठीं मोंगलांस मिळतील असें ह्मणण्यास तुमच्या मनाला शंका तरी कशी नाहीं वाटत? माणुस-पणा ज्यांच्या ठिकाणीं आहे त्यांना स्वराज्य नकोसें कधींही होणार नाहीं; व ज्यांना तें नकोसें झालें त्यांच्यासारख्या आत्मघातकी व दारुण पातकी मनु-ष्याच्या घरीं हा ब्राह्मण पाणी देखील पिणार नाहीं. मग वस्ति करावयाची गोष्ट तर राहूंद्याच! हा मी निघालों. येथून गावांत जाईपर्यंत अंधेरांत ठेंचकळलों, पडलों, आणि मेलों तरी बेहेत्तर; पण जातीनें मराठे होऊन स्वराज्याची निंदा करणाऱ्यांची सांवली देखील नको.

( पडशी खांद्यावर ठेवून काठी हापटत संतापानें पुटपुटत निघून जातो. )

**कोंडाजी**—पाटील, पाहिलत सवराजाचा अभिमान ह्यातार्‍याला कसा हाय त्यो! या परसंगी म्हराठमुलखांतल आन करनाटकांतल समद हिंदु सवराजापायी होवल्ये कराया तयार झाल्याती. न्वाडग्यांची ख्वाड तोडून म्हाराजांची गादी राखन्यापायी म्हारगरीब समर्थांच्या अंगात अक्शी आवेस चढलाया इच्याभन! न्वाडग्यांनीं लई मंडावल न काय!

**जावजी**—म्हनून तर समद हिंदु जिवावर उदार होऊन खवळल्याती न्हव! कोंडाजीराव, खर सांगूं? माझा तर तरक असा होतुया की, ह्यो तपत होऊन निघून गेलेला म्हातारा बिरामन कुनीबी भट गडी नसून थ्वार आन शेना मनुक्ष साताऱ्याहून गुत्तीस बहिरजीरावासनी भेटाया जानार असावा. तंवा आमचा ब्योत त्येसनी सांगितला तरीबी चालल. पन, हामी म्हराठगडी असूनशान सवराजाबद्दल अस वंगाळ बोललों, ही त्येंची समजूत होन चांगल न्हव. तंवा आम्ही बोललो त्ये त्येंच मन बघन्यापायी बोललो, अस सपष्ट सांगून त्यांचा संशव दूर करावा.

**कोंडाजी**—जावजीपाटील, व्हय; मीबी त्येच म्हनतो. आमचं मन कस हाय ह्येची त्येसनी खात्री पटली म्हणजे त्ये कोन, आन कशापायीं गुत्तीस निघाल्याती हो समद बोलत्याल; मग आपुनबी त्येना आपला ब्योत

सांगू. त्ये गांवाकड गेल असत्याल. त्येसनी मागार हटकून आनु आन हतच न्हाऊन घेऊं.

जावजी–चला राव; मलाबी वाटलच कीं, मटगडी असूनशान ह्येच्य। अंगांत इकती हिम्मत आन इकती शिपाईगिरी येनार कशी? तुह्मी ह्मनतां तसच कायबी असल; चला. ( जातात. )

---

## प्रवेश ८ वा.

**स्थळ–त्रिवेदी अरुणाचल येथील तुरुंग**

( खंडोपंत आपल्याशीं विचार करीत बसले आहेत. )

**खंडो०**–( आपल्याशीं ) हा पाहरेकरी जातीनें हिंदु, त्यांतून मराठा असल्यामुळें माझें केवढें तरी काम झालें आहे! त्याजपाशीं स्वराज्यासंबंधाची गोष्ट काढिल्यामुळें उशीरानें कां होईना, पण त्याचें मन द्रवलें; आणि माझ्या बदली माझ्याच स्वरूपाचा मनुष्य तुरुंगांत ठेवून घेऊन माझी सुटका करण्याचें त्यानें मला अभिवचनही दिलें. अहाहा! स्वराज्य, स्वधर्म आणि स्वदेश हे शब्द कानाला किती तरी गोड लागतात! ते उच्चारतांना मनाला किती तरी आल्हाद वाटतो! या शब्द त्रयींत अशी कांहीं अद्वितीय शक्ति व मोह आहे कीं त्याच्या योगानें केव्हांही, कोठेंही, व कोणत्याही मनुष्याच्या मनांत स्वाभिमानाची स्फूर्ति उत्पन्न झाल्यावांचून राहत नाहीं. तेव्हां धोंडीबा पाहरेकऱ्याची बुद्धि पालटली यांत नवल तें कसचें! हणमंतरावासारख्या

नराधमाची गोष्ट निराळी. मजवरील या संकटाचें कारण ही तो नीचच यांत संशय नाहीं. असो; बहिरोबाला माझ्या हातचें पत्र पोंचलें असलें तर तो पत्रदर्शनीं निघाला असेल. मग इतके दिवस कां लागावेत? माझ्या कमनशीबासारखें वाटेंत त्याजवर एखादें संकट तर ओढवलें नसेल ना! कारण दैव प्रतिकूळ असलें ह्मणजे सर्वच गोष्टी विपरीत होतात. पण मी येथें बसून काळजी केल्यानें काय होणार? जसें भवितव्य असेल तशा गोष्टी होणारच.

( बहिरोबा प्रवेश करितो. )

पहारेकरी—तुरुंगाच्या आसपास घिरट्या घालणारा कोण तूं? येथून मुकाट्यानें चालता हो. खानसाहेब येण्याची वेळ झाली आहे. तूं येथें हिंडत असलेला त्यांच्या दृष्टीस पडलास तर तुजवर तुरुंगांत बसण्याची पाळी येईल.

बहि०—( एकीकडे ) मी तर त्या करितांच महाराष्ट्रांतून येथवर आलों आहे. ( उघड ) शिपाईदादा, आमच्या एका आप्तास तुमच्या खानसाहेबांनीं येथील तुरुंगांत कोंडून ठेविलें आहे अशी मला बातमी लागल्यावरून मी त्याच्या शोधार्थ आलों आहे.

पहारेकरी—( आपल्याशीं ) हां समजलों; हा त्या खंडोपंताचा मुलगा असेल. चेहरा तर अगदीं हुबेहुब दिसतो. बापावरील प्रसंग ऐकून त्यानें धांव घेतली असावी. पोटीं मुलें असावींत तर अशीं! ( उघड ) कोण, तुझा कोणी आप्त तुरुंगांत आहे? असेल असला

तर. त्याच्याशीं तुला काम करावयाचें आहे. खानसाहेबांच्या परवानगीवांचून तुरुंगांतील कैदीची व तुझी गांठ मुळीच पडावयाची नाहीं. पाहिजे असल्यास त्यांना जाऊन भेट. येथें उभा राहूं नको.

**बहि०**—शिपाईदादा, मनांतील भीति टाकून मी सांगतों कीं, तुह्मी ज्यांच्यावर कृपा करण्याचें मनांत आणून मुद्दाम महाराष्ट्रांत मनुष्य पाठविला त्या खंडोपंतांचा मी मुलगा; माझें नांव बहिरू. माझ्या हातून पितृकार्य करविण्याविषयीं ज्या ईश्वरानें तुह्मांस सद्बुद्धि दिली तो तुमचें कल्याण करो!

**पहारेकरी**—हळू बोला. स्वराज्यासाठीं धोक्याचें काम पत्करून मी तुमच्या वडिलांस सोडण्याचें अभिवचन दिलें आहे. पण तुह्मी त्यांच्या बदली तुरुंगांत राहिल्यास कदाचित् कसा प्रसंग येईल आणि काय काय संकटें ओढवतील याचा नेम नाहीं. धैर्य असेल व कांहीं झालें तरी डगमगावयाचें नाहीं असा निश्चय असेल तर हें काम पत्करा; नाहींपेक्षां तुमच्या व तुह्मांबरोबर माझ्या गरीबाच्या गळ्याला फांस मात्र येईल. मीच खंडोपंत हा जबाब; दुसरा शब्द तोंडावाटे निघतां कामा नये.

**बहि०**—सर्व कांहीं विचार करूनच मी आलों आहें. मी तुरुंगांत राहून जर वडिलांवरील संकट टळतें व त्यांच्या हातून स्वराज्य रक्षणाचें काम होतें तर मी मरावयास देखील तयार आहें. दुसरें काय सांगूं?

**पहारेकरी**—ठीक आहे; आंत जा. आणि वडिलांना भेटून उभयतांचा काय निश्चय ठरतो तो मला कळवा. तुह्मी येथें त्यांच्या करितां रहावयाचें ठरल्यास त्यांच्या पायांतील जड बेडी व गळ्यांतील तोकचा सांखळदंड यांचा भार तुह्मांस सोसावा लागेल. चला, या दारानें आंत जा आणि झटकन् काय तें ठरवा.

( बहिरोबा आंत जातो व खंडोपंतास भेटतो )

**खंडोपंत**—( डोळ्यांत आंसवें आणून ) बहिरोबा, मी महाराष्ट्रांतून निघाल्यापासून येथें मोंगलांच्या कैदेंत पडेपर्यंतची सर्व हकीकत तुला कळलीच असेल. मी तुला पत्रीं लिहिल्याप्रमाणें या पाहरेकऱ्यानें मला येथून सोडण्याचें अभिवचन दिलें आहे. मी तुला संकटांत टाकून येथून सुटण्याची घाई केली नसती; पण काय करूं? स्वराज्यावर आज फारच कठीण प्रसंग गुदरल्यामुळें त्याची काय स्थिति होईल, हें समजत नाहीं. झुल्फिकरखान आज ६०००० सैन्यानिशीं जिंजीस वेढा देऊन बसला आहे. त्या शूर व निश्चयी सरदारानें जिंजी सर करून महाराजांस कैद करून बादशहापाशीं नेण्याची प्रतिज्ञा केल्यामुळें तो त्याप्रमाणें केल्यावांचून राहणार नाहीं. संताजीसारखा खरा हिंमतदार व निधड छातीचा कोणी पाठिंबा नसल्यामुळें एकट्या धनाजीरावाच्या किंवा इतर सरदारांच्या आंगीं शत्रूंची रग जिरवून त्यांना मागें पिटाळून लावण्याचें सामर्थ्य उरलेलें नाहीं. आणि अशा दुर्धर प्रसंगीं जरकां महाराज शत्रूंच्या हातीं लागले, तर मग

सर्वच गोष्टींचा शेवट झाला असें होऊन एकंदर महाराष्ट्रीयांवर यवनांची नीच सेवा पत्करण्याचा प्रसंग येईल. मग कसची स्वामिसेवा आणि कोठलें स्वराज्य! आपल्या आगचें कर्तृत्व शत्रूंस दाखविण्यास किंवा युक्तिप्रयुक्तीनें महाराजांवरील संकट दूर करण्यास अद्याप सवड आहे. पण, कोणतेंही राजकारण किंवा मसलत मी येथें कैदेंत राहून कशी होणार? माझी येथून मुक्तता झाली, तर शत्रूंनीं जरी किल्यास वेढा दिला आहे तरी मी किल्यावर जाऊन महाराजांस भेटेन व वेळ प्रसंग येईल त्याप्रमाणें स्वामिकार्यार्थ हा देह खर्चीन. आमच्या सुदैवामुळें आपल्यास पाहरेकरी वश झाला आहे. त्याच्या साहाय्यानेंच तुला महाराष्ट्रीं पत्र पाठविण्याची मला सवड मिळाली व तूं येथें आलास. तेव्हां आतां पुढें काय करावयाचें तें सांग.

**बहि०**—( गहिंवरून ) बाबा, तुह्मांसारख्या परम पूज्य व निस्सीम स्वामिभक्तांच्या पोटीं ईश्वरानें मला जन्म दिला व माझ्या हातून पितृसेवा घडविण्याचा हा सुसमय आणिला, याबद्दल मी त्या दयाशील प्रभूचे किती उपकार मानूं! महाभाग भीष्माचार्य पित्याच्या इच्छेनुरूप ब्रह्मचर्यव्रतासारखें तीव्र व्रत आमरण पाळून पितृभक्तीनेंच यालोकीं धन्य झालेना? तर मग अशा उत्कृष्ठ व्रताचा अव्हेर कोण करील! महाराष्ट्र-भूमीचें व राजाराम महाराजांचें रक्षण करण्यासाठीं तुह्मी आपल्या जिवाकडे न पाहतां संकटांत उडी घेण्यास जेथें तयार झालां, तेथें हा बहिरू स्वतांच्या

मुखाकडे कसा बरें पाहील! बाबा, हा लोहशृंखलेचा भार तुमच्या जिवास दुःख देत आहे हें माझ्यानें पाहवत नाहीं. मी येथें तुरुंगांत राहून तुमचीं दुःखें दूर होतात, तर हे कारागृहवासाचे हाल किंवा याही-पेक्षां दुःसह यातना सोसण्यास मी तयार आहें. तुह्मी येथून जाऊन स्वराज्यरक्षणाचें कामीं यत्न करा व यशस्वी व्हा; ह्मणजे त्यांतच उभयतांचेंही कल्याण आहे.

**खंडोपंत**—बहिरोबा, तुला येथें ठेऊन बाहेर पडावें असे विचार हा वेळपर्यंत माझ्या मनांत घोळत होते. पण, आतां पुनः असें वाटूं लागलें आहे कीं, मी येथून बाहेर पडून जिंजीकडे जावें आणि पाहरेकऱ्याचा व तुझा जीव धोक्यांत घालावा, यापेक्षां तुलाच जिंजीची कामगिरी करण्याबद्दल कांहीं गुप्त मसलती सांगून तिकडे जाण्यास सांगावें. कारण, तुझा जीव वांचला तर मजपेक्षां तूंच स्वामिकार्यास जास्त दिवस उपयोगी पडशील. माझी आता ह्यातान्यांतच जमा. तुझी ही भरज्वानी व या वयाला शोभणारी तुझ्या ठिकाणची ही तरतरी पाहून तुझ्या तारुण्यसुखाच्या आड येण्यास मी कसा तयार होऊं? तर आतां स्वामिसेवे-साठीं तूंच कंबर बांध. मी येथेंच राहतों.

**बहि०**—बाबा, पुत्रवात्सल्यामुळें तुमचें मन व बुद्धि चंचल होऊं पाहताहेत हें मी जाणलें. पण ही वेळ मनोविकारांच्या स्वाधीन होण्याची नव्हे. या वेळीं मनाला आंवरून धरिलें पाहिजे. अनेक मसलती योजून धैर्यानें आलेल्या संकटांतून पार पडण्याला जी दूर

दृष्टि, जो अनुभव व जें शहाणपण लागतें तें येण्याला आयुष्याचीं निम्मी वर्षें घालवावीं लागतात. तेथें पहिल्या पंचविशीचा काय उपयोग? बाबा, तुह्मीं एके ठिकाणीं बसून जीं कामें बजावाल तीं माझ्यानें त्रिभुवन धुंडूनही व्हावयाचीं नाहींत. त्यांतून प्रसंग अशा आणीबाणीचा; तर या वेळीं मोहजाल दूर सारून स्वकुलाच्या ब्रीदास जागण्यास तयार व्हा. कीर्तिसुखाच्या लाभापेक्षां संसारसुखाचा लाभ मला मुळींच जास्त वाटत नाहीं. या जगांत ज्याला कीर्तिसुख लाभलें तोच धन्य ! जास्त काय सांगूं? अशा कामाला विलंब उपयोगी नाहीं. पाहरेकऱ्याला मी हा आमचा निश्चय कळवितों.

**बहि०**—( बाहेर येऊन ) शिपाईदादा, तुह्मी वचन दिल्याप्रमाणें आपल्या वचनास जागून वडिलांची मुक्तता करण्याची मेहेरबानगी करा. तुमचे हे उपकार मी जन्मोजन्म विसरणार नाहीं. माझा निश्चय झाला. आतां उशीर नको.

**पहारेकरी**—बहिरोबा, पुनः एकवार विचार करा. वडिलांच्या जागीं कैदेंत राहून आयुष्याचे दिवस कंठण्यास तुमची तयारी आहे? निश्चय ढळल्यास फजीतीला पारावार नाहींसा होईल. कांहीं झालें तरी डगमगतां कामा नये.

**बहि०**—छेः तीं तुह्मी मुळींच भीति बाळगूं नका. उपकारकर्त्याचा जीव धोक्यांत घालण्यासारखें नीचपणाचें किंवा नामर्दपणाचें काम माझ्या हातून कालत्रयीं ही होणार नाहीं.

पहारेकरी—ठीक आहे. अनायासें स्वराज्याची सेवा माझ्या हातून घडते आहे असें समजून मी आपल्या वडिलांस एकवार वचन दिलें. आतां कांहींही होवो, त्यांत अंतर पडावयाचें नाहीं. चला, आंत या. (दोघेही आंत जातात.) खंडोपंत, पाय पुढें करा. (पाहरेकरी खंडोपंताच्या पायांतील बेड्या काढून बहिरोबाच्या पायांत घालतो.)

खंडोपंत—(दुःखानें) बहिरू, तुझें वय कोंवळें. अशा वयांत तुजवर दुःखाचे डोंगर आपल्या हातानें कोसळून घालण्यास मी तयार होत आहेंना! पण काय करूं? दैव आणि कर्तव्य यांच्यापुढें सर्व कांहीं विसरावें लागतें.

(पाहरेकरी खंडोपंताच्या गळ्यांतील सांखळदंड काढून बहिरोबाच्या हातीं देतो.)

बहि०—(सांखळदंड हातीं घेऊन) बाबा, मजसारख्या तरुणालाही न उचलणारें हें ओझें तुह्मी कसेंहो सहन केलें असेल! मी जिवंत असून तुमच्या देहाला अशीं दुःखें भोगावयास लाविलीं, तेव्हां मी किती तरी चांडाळ! असा कुपुत्र तुमच्या कुलांत जन्मास आला नसता तर बरें होतें. (सांखळदंड आपल्या गळ्यांत अडकवितो.)

खंडो०—(मुलास उराशीं धरून दुःखानें) बहिरोबा, हें बापाचें अंतःकरण; पण तें यावेळीं स्वराज्यासाठीं दगडासारखें घट्ट करून माझ्या गळ्यांतील ओझें मी तुझ्या गळ्यांत अडकविलें, याबद्दल तूं मला क्षमा कर. हा तुझा निष्ठुर पिता आपत्यप्रेमास विसरून जाऊन

आपल्या हातानें तुला दुःखसमुद्रांत लोटून देण्यास तयार झालाना! माझ्या इतका निर्दय जगांत कोणीही नसेल! बहिरोबा, तूं मात्र आपल्या ह्या पितृभक्तीनें व स्वराज्यनिष्ठेनें इहलोकीं आपल्या जन्माचें सार्थक करीत आहेस. माझ्यामागें खानास तुजबद्दलचा संशय आल्यास तो तुझे हालहाल करील ही गोष्ट मनांत आली ह्मणजे तुला यमाच्या हातीं देऊन जिंजीस जाण्यापेक्षां माझेंच काय होईल तें होवो, असें पुनः पुनः वाटतें. पण स्वराज्यावरील संकट पुढें उभें राहिलें कीं, प्रेमपाश छिन्नविच्छिन्न होतात व महाराजांचें रक्षण करण्यासाठीं कांहींही करावें लागलें तरी हरकत नाहीं असें वाटतें. बहिरोबा, श्रियाळाप्रमाणें तुझें धैर्य पाहून आपले देशबांधव स्वामिभक्तांच्या मुकुटमण्यांत अग्रस्थानीं तुझी गणना करोत! या आशीर्वादापेक्षां जास्त ह्या प्रसंगीं मी तुला काय देऊं?

**बहि०**—( डोळ्यांत आंसवें आणून ) बाबा, मजकरितां तुह्मी इतके कष्टी कां होता? मातापितरांची सेवा करणें व त्यांच्या दुःखांचा भार आपल्या शिरीं वाहणें हा पुत्रधर्मच आहे. त्यापेक्षां विशेष तें मी काय करीत आहे! स्वामिकार्यार्थ मरण्यासाठींच मी आपल्या कुळांत जन्म घेतला आहे. मी कारागृहवास भोगल्यानें आपल्या हातून जर महाराष्ट्रभूमीची सेवा घडते आहे, तर यापेक्षां दुसरें आणखी काय पाहिजे!

**खंडो०**-( स्फुंदत स्फुंदत ) शाबास, बहिरोबा शाबास! हें तुझें भाषण हेकून श्रीरामचंद्रानें वनवासास

निघतांना दशरथास जें उत्तर दिलें त्याची मला आठवण झाली. असो. सुदैवेंकरून माझे मनोरथ सिद्धीस गेले व ईश्वरानें तुला क्षेम राखिलें, तर लवकरच पुनश्च गांठी पडतील. नाहींपेक्षां ( दृढालिंगन देतो ) बाळा, या लोकीं हीच उभयतांची शेवटची भेट.

बहि०—बाबा, आतां बाहेर पडण्यास उशीर करूं नका. मजविषयींचें प्रेम मनांत न आणितां पुढील कार्याकडे दृष्टि द्या. वडिलांच्या कृपेनें सुदिन दृष्टीस पडले—व पडतीलही—तर राजाराम महाराज आपल्या घराण्याच्या हातून होणारी ही स्वामिभक्ति कधींही विसरणार नाहींत. बरें, दुर्दैवानें माझें कांहीं बरेंवाईट झालें, तरी मी ईश्वरापाशीं जाऊन स्वदेशबांधवांसाठीं करुणा भाकीन.

पाहरेकरी—हां, खंडोपंत लवकर येथून निघा. अवकाश कामाचा नाहीं. कदाचित् इतक्यांत कोणी इकडे आलें तर सर्व बेत फुकट जाईल.

खंडो०—बहिरू, येतों आतां अं. ईश्वर तुला सुखी राखो! ( जातो व पडदा पडतो. )



# अंक ४ था.

## प्रवेश १ ला.

स्थळ:–सैदापूर येथील चावडी.

( हुसेन शिपाई, मारवाडी व लिंगाईत या उभयतांस घेऊन येतो. )

**मार०**–अरे भाई, हमोने कटेनो लेने जावे? हमे किनेकी चोरीतो किदी नही और किनोको गटरो खायो नही. उताविळ क्यौं करीच्छे? दुकानने ताळातो घालवादे भाई!

**लिंगा०**—येन तंदी शिवा इदू! ( मुसलमान शिपाई गळ्यांतील लिंगास हात घालून ओढतो ) ये मुसला, हमारे लिंगको मुटक्याडा. ना येन तप्प करे?

( मोंगल फौजदार इस्मायलबेग हुक्का पीत बसला आहे असा पडदा उघडतो. )

**हुसेन शिपाई**–( मारवाड्यास व लिंगाईतास फौजदारापुढें उभे करून ) फौजदारसाहेब, ये मारवाडी और ये बनिया दुकानपर आपसमे बातां करते बैठते. इनके बातोंमें 'संतू संतू' ऐसा कुछ चलाथा. उस सबब ये दोनूकूं सरकारके पास लायाहों. संताजी ये गांवमे कब आयाथा और ओ अब किधर गया है, ये सब बात इन्हकू मालुम रहना ऐसा नजर आता है. ये

मारवाडी बहोत काफर है. इसकू अच्छा तऱ्होंसे समज दिये तो ये काफर सबकुच कहेंगा.

**फौजदार**—क्यों मारवाडी, तुम ये बनियाकेसाथ क्या बात कर रहाथा, सच कह्दे? हमारेसामने किस तऱ्हेकी हफतफ नही चलेंगी.

**मार०**—फौजदारसाहेब, हम वापारकी बात कर· ताहा. मारवार देशसूं मैं लोटो और सोटो लिनआयो, कुत माथापरनी पगरी देवन नही आयो. अंगनो समरो गयो तो फिकीर नही, पिन दमरी नही सोरूं. ये चनग· छपा मोटो बेपारी होवेने हमारी दो बरसकी बाकी देवे नही. मंगाहे मंगाहेने थके गया; लारा सूं खुद गयो. अमीरसाहेब, आपी बोलो कीं, दो दो बरस उदार राखीने धंदो किस तऱ्हे चलावूं?

**लिंगाईत**—रामलाल, नावु इष्टु दिवस निम्म बाकी इटकोंडेवू हींगे निमगे काणीसुत्तदेनु? नीवु बरकोळलिके मरतरे हेळलागेनु.

**मारवाडी**—( रागावून ) अरे, मरतो कसा? बे- पारी है कीं हजाम है! चनमल्लपा, रुपिया दिदाता तो जमा कर लेते हो.

**लिंगाईत**—येन हेळली आप्पा! नम्मल्ले मदवी आदनंतर तिंगळदोळगे यल्लार बाकी चुकता माड बि· ट्टिदेनु. निम्म ह्यसरले नम्मल्ली २४७ रुपाई खर्च सुद्धा बिद्दिदे. मत्त येन हेळली!

**मारवाडी**—यान नही केळते ब्यान नही केळते.

रुपिया है की ठट्टा है! तमे लोक ऐसी बात करी करीने हमारो दिवाळो कडवायो.

**फौजदार**—हुसेन, आपनेमे ये क्या गध्धेकेमाफक लढने लगे? मारवाडी, तुम संताजीकी क्या बात बोलताथा सच कहदे. तुमारी बेपारकी बात नही होना. ( चनमल्लपाकडे वळून ) ए बनिया, तुमारा नाम क्या चुनमुल्ला? तुमारी जात लिंगाईत है, और लिंगाईत बोलेतो सच कहनेवाले रहते हैं. उसवास्ते ये मारवाडीके साथ तुम संताजीकी क्या खबर बोलतेथे सच कहो. संताजी इधर कब आयाथा और इधरसे किधर निकल गया, ये सच नही कहे तो शिर उडाऊंगा.

**लिंगाईत**—( घाबरून कांपत कांपत ) साब्र, हमारी बात निमग तिळु दिल्ला, मत्त तुमारी बात हमारे मालुम इल्ला. ई रामलालन अंगडीसे सामान लियाथा ई मातु खरे; परंतु इवन आदमीसाथ रुपायी आगे कळस भेजे. ईग रामलाल नही अंदरे क्या करना?

**फौजदा०**—ये बेवकूफ, तुमारा अंगडी कोन पुछताहै? संताजी घोरपडे किधर है बोल. नही तो ये बडे पेटपर लाथ मारूंगा. ( अंगावर जातो )

**लिंगा०**—( घाबरून कांपत ) हौदरी घावरू. उसका ह्यसर संतू; घोरपडी नही. उसमे कयाग रुपायी कोट्टिल्लने.

**मारवा०**—अरे, असा कसा माताडतो? रुपये दिये नही. संतू तो हमारी दुकान छोडीने बरस हुयो.

**दुसरा शिपाई**—खानसाब, ये मारवाडी झूट कहता

है. इसकू अच्छा समज दियेबगर सच कहनेका नही. संताजीकू मऱ्हेठोंकी छावणी छोडकर छे सात महिने हुवे. और वो बरसके अवल इधर कैसा आवेगा?

मारवा०—फौजदारसाहेब, संतू हमारी दुकन छोडीने एक बरस हुयो सच. दुकन पर तिने बदलीने दुसरो नोकर रखियो; तिने बुलाईने पुछे तो मालुम पडे.

फौजदा०—करीम, ए क्या बोलता है मारवाडी? मऱ्हेठोंका सरदार संताजी ए मारवाडीके दुकान नोकर कैसा रहेगा? उसकू अच्छा तऱ्होंसे पुछो.

मारवा०—पुछतो कशाला? मराठो मुलुख छोड कर्नाटकमे आवारी वगतना संताजीके बराबर लेगो आज दसबारा बरस हुया.

लिंगा०—साबर, ई संताजी अंबुत्र मनशान हातमे ना रुपायी दिये. मत्त रामलाल नही बोलतो.

फौजदा०—हुसेन, ये मारवाडी और ये लिंगाईतकू मऱ्हेठोंका सरदार संताजीकी कुछ खबर मालूम नही, ऐसा दिखता है. ये मारवाडीके नोकरका नाम संतू था. उसकी कुछ खबर इन्हो आपसमे बोलते होएंगे. दोन्हूकू छोड देव.

हुसे०—खांसाहेब, ये मारवाडी बडा लुच्चा आदमी है. संताजीकेवास्ते इसकू कुछ मालुम नही तब भी कल्ल हम इसके दुकानमे सामान लेने गये तो इने 'कहांका फौजदार हम नही जानता' ऐसा मगरुरी बात किया

फौजदा०—अच्छा, मारवाडीको पहारेमे देदो और लिंगाईतकू छोड दे.

( लिंगाईत निघून जातो इतक्यांत एक शिपाई घाबऱ्या घाबऱ्या धांवत येऊन वर्दी देतो )

शिपाई—( धांवत येऊन कांपत कांपत ) खांसाहेब, मऱ्हेठोंका सरदार संताजी आपने साथीदार बराबर लेके बहोत नजदीक आया है, ऐसी खबर मालुम होती है.

फौजदा०—( घाबरून ) क्या, संताजी घोरपडा नजदीक आया? या अल्ला! करीम, हमारा घोडा किधर है? ( गडबडीनें उठूं लागतो तों हुक्याची नळी एकीकडे पडते, तलवार जमिनीवर तशीच रहाते, उलटी ठेवलेली पगडी तशीच डोक्यावर ठेऊन पोशाख सांवरत घाईघाईनें पळतो ) हुसेन, भागो. अरे, मेरी तलवार! अबी जान बचानेकी बहोत मुष्कील है. भागो, भागो. या अल्ला! ( सर्व निघून जातात )

## प्रवेश २ रा.

स्थळ—लिंबूर येथील मारुतीचें देवालय.

( नानासाहेब सर्पदंश होऊन बेशुद्ध पडले आहेत )

पुजारी—सुव्याच्या आजीबाईना निरोप पाठवून बराच वेळ झाला; पण त्या अद्याप कां आल्या नाहींत कांहीं समजत नाहीं. कोणाला सर्पदंश झाला आहे असें त्यांच्या कानीं पडलें कीं पुरे; हजार कामें असलीं तरी तीं एकीकडे ठेवून त्या औषध घेऊन आल्यावांचून रहात नाहींत. मग आजच असें कां झालें असावें बरें?

मी पाठविलेला निरोप तरी त्यांना कळला आहे कीं नाहीं कोण जाणे? मी स्वतांच गेलों असतों; पण हा असा येथें एकटा पडलेला टाकून कसें जावें ह्मणून गेलों नाहीं.

( इतक्यांत वृंदा व खंडू औषध घेऊन येतात )

वृंदा—खंडू, तूं आतां घरीं जा आणि मळ्यांतील काम आटपून आजीबाईनीं सांगितल्याप्रमाणें आणखी दोन तासांनीं ये. तोंपर्यंत मी इथंच असते.

पुजा०—बाई, आजीबाईनीं तुह्मांबरोबर औषध देऊन पाठविलें आहे वाटतें? मी केव्हांपासून वाट पहातों आहे. ह्मटलें, निरोप तरी पोंचला कीं नाहीं?

वृंदा—होय, निरोप पोंचला; पण औषध लौकर मिळालें पाहिजेना? आजीबाईच्या आंगांत नीट नाहीं. तेव्हां मला औषध मिळायला उशीर लागला. ( नानासाहेबांकडे पाहून ) हाच का तो वाटसरू? अगबाई वीष तर भारी चढलेलं दिसतं!

पुजा०—पहा, ही याची अशी स्थिति झाली आहे. घटकेपूर्वी हा चांगला शुद्धीवर होता. आंगांत वीष भिनतांच हा बेशुद्ध झाला. बरें; तुह्मीं आणलेलें औषध आधीं याला पाजा; मग पाहूं काय होतें तें. मी याची दांतखिळी उघडतों. ( तोंड उघडतो )

वृंदा—( औषध पाजून ) पुजारीबावा, झेंडू फुटण्यापूर्वी पोटांत औषध गेलं आहे, तेव्हां गुण आल्यावांचून रहावयाचा नाहीं. ( ओटींतून आणलेला पाला थोडथोडा घेऊन त्याच्या हातापायाला व पोटाला चोळते )

पुजा०—तुमच्या आजीबाईचें औषध सर्पदंशावर रामबाण आहे ह्मणतात; तेव्हां हजार वांच्यांनीं गुण द्यावा. बळभीमाच्या कृपेनें गरीब बिचाऱ्याचा जीव वांचला तर तुझीच त्याला जीवदान दिलेसें होईल.

वृंदा०—( पाला चोळीत असतां ) चिन्हें सगळीं चांगलीं आहेत. ही पहा याची पूर्वीची चर्या पालटत चालली; तेव्हां औषधानें आपला अम्मल केला असावा. आणखी एका घटकेनें हा चांगला शुद्धीवर येईल असें वाटतें. पण ताजें थंड पाणी आहे का इथें आणलेलें? हा सावध झाला कीं याला पाण्याचा शोष पडेल.

पुजा०—तोंपर्यंत मी ताजें पाणी घेऊन येतों. कोणीकडून तरी तुमच्या हाताला यश येवो, ह्मणजे झालें. ( जातो. )

वृंदा—( आपल्याशीं ) आतां उतार पडणार यांत आतां संशय नाहीं. तेव्हां माझ्या मनांत प्रथमदर्शनीं उत्पन्न झालेला संशय खरा ठरल्यास उजवा डोळा सारखा दोन दिवस लवत असलेल्याचा कांहीं गुण आहे असें ह्मणतां येईल. काय असेल तें असो ! कुलस्वामिणीला माझी दया आली असल्यास तिच्या इच्छेनें काय होणार नाहीं ! ( चेहऱ्याकडे पुनः लक्षपूर्वक पाहून ) होय; तेच हे. आई जगदंबे,........

नाना०—( डोळे उघडून बारीक स्वरानें ) भटजी, मला पाणी पाजा.

वृंदा—भटजी पाणी आणायला गेले आहेत, इतक्यांत येतील. ( पदरानें वारा घालते ) जलाल औषधानें

अंगाचा दाह व्हायचाच. आतां किंचित् बरं वाटतं कां?

( पुजारी पाणी घेऊन येतो )

पुजा०—बाई, कसें काय? हें पहा पाणी आणिलें. तो शुद्धीवर आला काय? डोळे तर उघडलेले दिसतात.

वृंदा—होय, चांगली शुद्धि आली आहे. पण गळ्याला शोष पडल्यामुळें बोलवत नाहीं. ( पळीनें पाणी पाजते ) पुजारीबावा, तुह्मांला आमच्या घरापर्यंत जावं लागणार. कारण हा पाण्याचा शोष बंद होण्याकरितां आजीबाईनीं माझ्यापाशीं एक गोळी दिली होती; ती मी घरींच कुठंतरी विसरून आले आहे. तेव्हां आजीबाईंना विचारून ती आधीं घेऊन या. ह्मणजे इतकी खटपट केलीत त्याचं सार्थक झालं!

पुजा०—घेऊन येतों. मला खेप पडली तरी हरकत नाहीं. पण बिचाऱ्याचा जीव वांचला हें जास्त. ( जातो )

वृंदा—( आपल्याशीं ) हेच ते सरदार पुत्र. मला माझ्या दुःखांतून सोडविण्यासाठीं त्या जगदंबेनंच यांच्यावर हा प्रसंग आणिला आणि तीच माझ्या हातून ही सेवा घडवीत आहे. ( ओटींतील गोळी काढून ) अरेच्या, ही गोळी माझ्या ओट्यांतच आहे! मला वाटलं मी घरीं विसरून आले. उगीच पुजाऱ्याला हेलपाटा पडला. पाण्याच्या घोटाबरोबर ही गोळी पोटांत गेली ह्मणजे शोष कमी होईल. ( तोंडात गोळी घालते व पाणी पाजते. )

नाना०—( चांगले सावध होऊन उठून बसतात ) भगिनींना व्यर्थ खेप पडली. माझ्याकरितां त्यांनीं पुष्क-

ळच श्रम घेतले. बाई, तुम्हांला त्यांनींच आणिवलें वाटतें. मी बेशुद्ध झाल्यापासून हा वेळपर्यंत काय झालें तें मला मुळींच स्मरत नाहीं. तुम्हांसारख्या परक्यांच्या हातून शुश्रुषा करून घेण्याचा प्रसंग देवानें आणला, याबद्दल मनाला वाईट वाटतें; पण उपाय नाहीं.

**वृंदा**–( उठून मर्यादेनें दूर उभी राहते ) आपल्या सारख्यांची सेवा हातून घडायल तरी पुण्याई हवी! परकीपणा नाहींसा व्हावा यासाठींच ईश्वरानें हा योगायोग घडवून आणला नसेल कशावरून?

**नाना०**–( आश्चर्यानें आपल्याशीं ) हा काय चमत्कार! या स्त्रीचा मर्यादशीलपणा, सलील वर्तन व परोपकार बुद्धि यांच्या योगानें मनाला आनंद होणें हा भाग निराळा. पण तिच्या अल्प सहवासानें माझ्या मनाची जी ही चमत्कारीक स्थिति जाहली आहे, याचें कारण काय असावें बरें! त्यांतून आतांच्या तिच्या भाषणावरून व सलज्ज दूर उभे राहण्यावरून मनांत भलतेच तर्क येऊं लागले आहेत. तेव्हां कांहीं तसाच पूर्व ऋणानुबंध नसेल ना! ( उघड ) दुसऱ्यावर उपकार करण्याची वेळ आली ह्मणजे ती फुकट जाऊं न देतां कायावाचामनें करून झटणें व परकीपणा न दाखवितां एखाद्याच्या उपयोगी पडणें हें कुलीनावांचून दुसऱ्यांच्या हातून होणें नाहीं. तेव्हां तुमचें भाषण तुमच्या थोरपणाला शोभण्यासारखेंच आहे हें खरें; पण मी अनोळखी वाटसरू असून घरच्या माणसापेक्षांही माझी जास्त आस्थापूर्वक शुश्रुषा करावी व पुनः

माझाच गौरव करण्यांत आणि स्वतांला धन्य मानून घेण्यांत तुम्हांला हौस वाटावी, याचें मला मोठे गूढ व आश्चर्य वाटतें. तेव्हां तुमचें नांव काय हें समजल्यास बरें होईल.

वृंदा—आपण या अभागी वृंदेचा अंत असून कोठवर पाहणार? निजलेल्याला कोणी तरी जागं करील पण जागं असून झोपेचं सोंग घेणाऱ्याला कोण कसं बरं जागं करूं शकेल?

नाना०—( उठून जवळ जाऊन ) कोण वृंदे! भाषणावरून व एकंदर वागण्यावरून मला तसा संशय आला खरा. पण तूं या ठिकाणीं कशी येशील असें पुनः मनाला वाटलें. वर्षापूर्वीं बागेंत तुझें पाहिलेलें तें प्रफुल्लित मुखकमल आणि आतांचें तुझें कोमेजलेलें रूप यांत कितीतरी फरक पडला असल्यामुळें जिवाची पुरी खात्री होईना. ह्मणून शेवटीं नांव तरी विचारून पहावें ह्मटलें. बाळे, साबाजीराव कोठें आहेत व घरदार सोडून परदेशांत येण्याचा प्रसंग तुजवर कां बरें आला? या तुझ्या सर्व दुःखाला हा दुर्दैवी राणोजीच कारण असल्यास मी हा पदर पसरला आहे; क्षमा कर. साताऱ्यास तुमच्या घरीं आलों तेव्हांच तूं मला आपल्या प्रेमपाशांत गुंतविलेंस हें मी जाणलें; पण ईशकृपेनें तसा लग्नाचा योगायोग जुळून येईपर्यंत तजप्रमाणें मलाही वाट पहाणें भाग होतें. तें सर्व असूं दे; परंतु आधीं तूं येथें कशी आलीस हें मला सांग.

वृंदा—ती जन्मकथा फार लांब आहे; पण थोडक्यांत

सांगतें. आपण सातारा सोडल्यानंतर थोडक्याच दिव-
सांनीं बाबा वारले. पुढं सावत्रपणाचा जाच माझ्यानं
सहन करवेना; तेव्हां घरीं राहून रात्रंदिवस बोलून
घेण्यापेक्षां बाहेर पडावं आणि आपला शोध काढावा
असा निश्चय केला. त्याप्रमाणं महाराष्ट्रांत हिंडून
आपला कुठही थांग लागला नाहीं; तेव्हां कर्नाटकांत
आले. पण या परदेशांत मला कसला शोध लागतो?
वाटेंत अनेक संकटं सोसल्यावर लिंगसूर गांवीं जोगि-
णीचा वेश घेऊन भिक्षा मागत असतां इथं सुर्व्यांच्या
आजीबाईंची व माझी गांठ पडली. त्यांनीं माझी ती
स्थिति पाहून आपल्या घरीं मला ठेऊन घेतलं; तेव्हां
पासून मी इथं राहिलें आहे.

**नाना०**—ईश्वराच्या घरचा नेमानेम कसा असतो
हें कोणालाही कळत नाहीं असें ह्मणतात, तें अगदीं
खरें. तुजवर असा प्रसंग येऊन तूं परदेशांत यावीस
व सातारा सोडल्यानंतर शत्रूंच्या अटकेंत राहण्याचा
प्रसंग आल्यामुळें माझी अशी दशा व्हावी आणि
शेवटीं माझ्या प्राणावर गेऊन बेतली असतां तुझ्या
हातून माझा जीव वांचावा असाच दैवाचा संकेत
होता; त्याप्रमाणें सर्व कांहीं घडून आलें. त्यांत कोणा-
चाही दोष नाहीं. असो; तुझी गांठ पडली हें एक
प्रकारें बरें झालें. कारण, साबाजीराव मरण पावले व तूं
घरदार सोडून कोठें निघून गेलीस असें मी ऐकलें
असतें, ह्मणजे काय प्रकार झाला असता हें माझ्यानें
सांगवत नाहीं. पण आतां तूं येथें आहेस हें समजल्या-

मुळें मी ज्या जरूरीच्या कामाकरितां गुत्तीस निघालों आहे तें झालें, कीं तुला येथून नेण्याची तजवीज करीन.

वृंदा—पण मी आतां आपल्याला एकट्यानं जाऊं देईन तेव्हां ना? आजपर्यंत झालं तें झालं. अजूनही ह्या दासीचा अंगिकार करावयाचा नसेल, तर तसं स्पष्ट कळूं दे.

नाना०—( हनुवटी धरून ) बाळे, संकटाचे वेळीं जीवदान देणाऱ्या प्रियेला आतां मी विसरेन असें तुला वाटतें तरी कसें? या वेळीं मात्र मला तसें करितां कामानये. कारण पितृकार्य शिरावर असतां मी जर आज तुला बरोबर घेऊन गुत्तीस गेलों, तर काका काय बरें ह्मणतील! मी असा प्रेमपाशांत गुंतून राहिल्यामुळेंच मला साताऱ्याहून येण्यास दीनावधी लागली असें काकांना किंवा आबासाहेबांना वाटल्यावांचून राहणार नाहीं. यासाठीं अशावेळीं बरोबर येण्याचा आग्रह धरूं नको. तूं समंजस व विचारी आहेस. तेव्हां आबासाहेबांवरील हें आलेलें संकट दूर झालें, कीं मना जोग्या सर्व गोष्टी होतील. तोंपर्यंत तूं येथेंच रहा.

वृंदा—कांहीं तरी उगीच निमित्त सांगून बरोबर न नेण्याची ही युक्ति आहे झालं. पण मी नाहीं अशानं फसणार. आतां जर आपण मला एकटीला टाकून गेलांत तर खरंच सांगतें, कीं ही वृंदा पुनः जिवंत आपल्या दृष्टीस पडणार नाहीं.

नाना०—असे निष्ठुर व अविचाराचे शब्द तोंडावाटें काढून या राणोजीला व्यर्थ कष्टवूं नको. आधींच शत्रूंच्या प्रतिबंधांत सांपडल्यामुळें जो कार्यभाग माझ्या

हातून व्हावयाचा तो झाला नाहीं ह्मणून रात्रंदिवस जिवाला चैन नाहीं; शिवाय आबासाहेबांवरील संकटाचा परिहार केव्हां व कसा होईल ही दुसरी काळजी. असें असतां आणखी या तिसऱ्या संकटांत मी पडावें अशीच तुझी इच्छा असली, तर मग हा आग्रह ठीक आहे. तेव्हां विचार कर. विशेष माझ्यानें कांहीं सांगवत नाहीं.

**वृंदा**–( सुसकारा टाकून ) माझ्याकरितां इतका आपल्याला त्रास होत असेल, तर माझा आग्रह नाहीं. कारण, आपल्या जिवाला जें सुख तीच जर माझी विश्रांति तर मी भलताच हट्ट धरून काय उपयोग? आजपर्यंत जसे दिवस काढले, तसे आणखी कांहीं दिवस काढावे लागले तरी हरकत नाहीं; पण ....

**नाना०**–पण काय? ( जवळ जाऊन व गळ्यांत हात घालून ) लाडके, जिवांत जीव आहे तोंपर्यंत हा राणोजी तुला कधींही विसरणार नाहीं. झालें?

**वृंदा०**–दुसरं या दासीला काय पाहिजे? आतां कसा तरी आजचा दिवस येथेंच मुक्काम होणार. तेव्हां मी घरीं गेलें ह्मणजे आजीबाईकडून तिकडच येण्याबद्दल निरोप पाठविते. इथं राहिल्यानं.........

**नाना०**–वृंदे, तेवढें मात्र करूं नको. मी अमूक असें तिसऱ्याच्या कानीं गेलें कीं घोंटाळा झालाच. कारण, शत्रु जेथें तेथें माझ्या पत्त्यावर आहेत. तेव्हां मला वाटसरू ह्मणून येथेंच राहिलें पाहिजे. ते पहा भटजी आले वाटतें. तूं आतां घरीं जा.

वृंदा-( खंडू व पुजारी आलेले पाहून ) खंडू, आलास का? पुजारीबावा, गोळी इथं माझ्या जवळच होती. नीट न पाहिल्यामुळं तुह्मांलामात्र फुकट येरझाऱ्या झाल्या. आतां पाण्याचा शोष वगैरे कांहीं नाहीं. प्रकृति पूर्वीप्रमाणं साफ झाली आहे. मी घरीं गेलें ह्मणजे थोडसं खायचं पाठवून देतें; यांना तें द्या ह्मणजे झालं.

पुजा०-तरी ह्मटलें, घरीं कोठेंच गोळी सांपडेना! ( नानासाहेबाकडे बघून ) काय बुवा. आतां पूर्वीसारखी प्रकृति वाटते ना? आयुष्याची दोरी बळकट होती ह्मणून बचावलांत. बाई, तुमचे खरे खरे उपकार आहेत बरें! आजीबाई तुमची घरीं वाट पाहताहेत. त्यांनीं तुह्माला पाठवून द्यायाला सांगितलें आहे.

वृंदा-माझे कसले उपकार? त्या मारुतीची कृपा. खंडू, चल बाबा. ( जातात व पडदा पडतो )

---

## प्रवेश ३ रा.

स्थळ-जिंजीच्या राजवाड्यांतील दिवाणखाना.

(राजाराम महाराज बसले असतां खंडोपंत व किल्लेदार फकीराच्या वेशानें प्रवेश करितात.)

दुनिया दो रोजा है फजर, फिर हम कहां और तुम कहां ॥ ऐसा वो एक दिन आवेगा, ना बात करने पावेगा ॥ रुह कब्ज कर ले जाएगा,

फिर हम कहां और तुम कहां ॥ जो साहेबे ईमान है, उसके तयीं पहिचान है ॥ दो दिनकी ये गुजरान है, फिर हम कहां और तुम कहां ॥

खंडो०—(राम राम करून बसल्यावर) काल ठरल्याप्रमाणें किल्याखालीं जाण्याकरितां आह्मी तयारीनें सरकारचा निरोप घेण्यासाठीं आलों आहो.

किल्ले०—ये फकीर खाविंदकेपास कुछ सवाल करनेलिये चाहता है सरकार.

महा०—किल्लेदार, फकीराचा वेश मात्र हुबेहुब बनविला आहे. चिटणिसांना तर मी प्रथम खरोखर ओळखलें देखील नाहीं.

खंडो०—छेः हा कसला वेश! रात्रीच्या वेळीं फारसें कोणी ओळखणार नाहीं ह्मणून बनविली आहे ही सरासरी दाढी. शिवाय, जायचें आहे तें ही मराठ्यांच्या गोटांत. एखाद्या मुसलमान सरदाराची जर कां भेट घ्यायची असती, तर तो थाट कांहीं वेगळा करावा लागता.

महा०—बरें; चिटणीस, शिरक्यांची भेट झाल्यावर त्यांजपाशीं कोणती गोष्ट प्रथम काढणार? त्यांच्याशीं फार बेताबातानें व रावरंग पाहूनच वागलें पाहिजे. कारण, ते उभयतांही बंधु फार तापट असून आमच्याविषयीं तर त्यांचें मन पूर्वीपासून खवळलेलें आहे. तेव्हां तुह्मीं मनांत आणिलेलें राजकारण कसें निभावतें आणि काय प्रकार होतो, याची मला मोठी भीति आहे. सांगून सवरून ते शत्रुपक्षाकडील सरदार;

ते आमचे नातेवाईक असले तरी आमच्या कल्याणाची इच्छा त्यांच्या मनांत येईल किंवा नाहीं याची शंकाच. तेव्हां त्यांच्या तंबूंत ह्मणजे त्यांच्या पूर्ण कह्यांत तुह्मी आपण होऊन सांपडल्यावर एखादा भलता प्रसंग आला नाहीं ह्मणजे पुरे!

खंडो०—तसा प्रसंग सहसा येणार नाहीं; व आलाच, तर किल्लेदार आहेत बरोबर.

किल्ले०—सरकार, त्याविषयींची भीति आपण बिलकुल मनांत आणूं नये. आमचा बाहेरून जरी हा गरीब फकीराचा वेश असला, तरी स्वसंरक्षणाची सर्व तयारी आहे आह्मांबरोबर. चिटणिसांवर जर कांहीं तसा प्रसंग येण्याचा रंग दिसलाच, तर हा किल्लेदार त्यांना पाठीवर टाकून दांडपट्टा चमकावीत शत्रुसैन्यां-तून वाघासारखा डरकण्या फोडीत पार निघून येईल.

खंडो०—महाराज, असे किल्लेदारासारखे शार्दूल आपल्या पदरीं आहेत ह्मणून तर आह्मी पाहिजेत्या संकटांत उडी घेण्याला किंवा कोणतेंही धाडसाचें काम हातीं घेण्याला नेहमीं तयार होतों. शिर्क्यांपाशीं मी या राजकारणाची गोष्ट काढली ह्मणजे ते रागावतील, संतापतील, इतकेंच नव्हे तर आह्मांला सगळेच उचलून तोंडांत टाकूं कीं काय असें त्यांना होईल हें खरें; पण युक्तिप्रयुक्तींनीं व भाषणचातुर्यानें त्यांचें मन वळविलें नाहीं किंवा स्वराज्याबद्दलचें प्रेम त्यांच्या मनांत उत्प-न्न करून आमचें कार्य करण्याविषयीं त्यांचें वचन घेतलें नाहीं, तर चिटणिसाचें जिणें व्यर्थ.

महा०—चिटणीस, तुह्मी एखादी गोष्ट करण्याचें मनांत आणिलेंत ह्मणजे पाहिजे तो यत्न कराल, हवी ती युक्ति योजाल आणि कोणाला कल्पनाही करितां येणार नाहीं असा मुत्सद्दीपणा लढवून दुसऱ्याच्या पोटांतील पाणी हालूं न देतां आपली कामगिरी फत्ते करण्याविषयीं जिवापाड मेहनत घ्याल यांत शंका नाहीं. पण इतकेंही करून शिर्क्यांनीं तुमचें ह्मणणें कबूल केलें नाहीं, तर पुढचा विचार काय ?

खंडो०—हा डाव फसला, तर झुल्फिकरखानाशीं तहाचें बोलणें लावून तिकडून यत्न करावयाचा, हें ठरलेलेंच आहे. आणि शत्रु तह करण्यालाही कबूल होत नाहींत असें झालें, ह्मणजे मग शेवटचा उपाय. आटोळे, थोरात, विश्वासराव, पवार इत्यादि किल्यावरील सरदारांची वीरश्री व शत्रूंशीं लढण्याविषयींची त्यांची उत्सुकता हीं कालच्या दरबारांत दिसून आल्यावरून माझी तरी पक्की खात्री झाली आहे कीं, वखत पडला तर शत्रूंच्या तोफांची सरबत्ती, बाणांचा वर्षाव किंवा समशेरीचे चपाटे यांस न जुमानितां रक्ताचे पाट व प्रेतांच्या राशी तुडवीत ते सरकाराचा जीव बचावून सुखरूपपणें महाराष्ट्रीं पोंचवितील. पण, तसा प्रसंग टळावा ह्मणून रामचंद्रपंतांनीं सुचविलेली ही शहाणपणाची मसलत साधण्याकरितां होतां होईलतों खटपट करावयाची.

किल्ले०—चिटणीस, रामचंद्रपंतांच्या व तुमच्या विचाराला जी मसलत आली व जिला महाराजांचाही

सल्ला मिळाला तो शिरसा मान्य करण्या इतकाच आ-
मचा अधिकार व सरकारच्या हुकुमाला मान देणें हेंच
आमचें कर्तव्य; ह्मणून मी व विश्वासराव वगैरे मंडळी
काल गप्प बसलों. नाहींपेक्षां समशेर बहाद्दूर पाटणकर
व कांकडे यांचे मराठ्यांच्या ब्रीदाला न शोभणारे
विचार व त्यांचीं तीं नाउमेदीचीं भाषणें ऐकून मला तर
संताप चढला होता. व अजूनही असें वाटतें कीं,
किल्ल्यावरून निकराचा हल्ला करावा व गनिमांची एक-
वार तरी पुरी खबर घ्यावी. रणशूर मराठ्यांनीं आपले
पूर्वज कसे होते हें ध्यानांत ठेवून आपल्या बाहुबलानें
जर शत्रूंस गर्भगलित केलें नाहीं किंवा रक्ताचे सडे
शिंपून पैदा केलेल्या स्वराज्याकरितां बळी जाण्यास
आह्मी तयार झालों नाहीं, तर जगून तरी काय
करावयाचें !

खंडो०–किल्लेदार, तुह्मी क्षत्रियांचे बच्चे आहांत व
क्षत्रियांनीं नेहमी धोक्याच्या व संकटाच्या कामांत
उडी घेण्यास तयार असलें पाहिजे हें खरें. पण तशी
उडी घेण्यानें जेथें कांहींइतकाही लाभ होण्याची आशा
नाहीं, तेथें नुसत्या अभिमानासाठीं जिवाची आहुती
देण्यापेक्षां अंगांतील ईर्षा पुढील महत्वाच्या कार्यासाठीं
राखून ठेवून युक्तीनें पार पडण्यांत विशेष शहाणपणा
नाहीं का ?

महा०–किल्लेदार, शत्रूंशीं युद्ध तर करावयाचेंच.
पण चिटणिसांनीं व रामचंद्रपंतांनीं मिळून जो हा
विचार मनांत आणिला आहे, त्या युक्तीनें आपली सर्व

मंडळी एकत्र करूं. शत्रु जातात कोठें? त्यांची व आमची जन्माची गांठ आहे. किल्यावर असें कोंडून घेऊन लढण्यांत व व्यर्थ प्राणहानि करण्यांतच ह्मणजे मोठासा पुरुषार्थ आहे, असें नाहीं.

किल्ले०—सरकारच्या विचारा बाहेर माझें कांहीं ह्मणणें नाहीं. हुकुमाच्या जोरावर दृढनिश्चयानें शौर्याची तलवार चालविणें एवढेंच आमचें काम. दूरदृष्टि, पोक्त विचार, किंवा मुत्सद्दीपणा हीं आह्मांला कशानें समजणार? तें युक्तीचें काम ज्यांचें त्यांनींच करावें.

खंडो०—किल्लेदार, अगदीं योग्य बोललांत. पण बोलण्याच्या नादांत रात्र किती झाली याचा विचार केलात का? आह्मांला पाळण्यांत बसून किल्याखालीं उतरून शत्रूंच्या गोटांत जावयाचें, तेथें शिरक्यांची भेट घेऊन आपल्या राजकारणाला ते कसे वश होतील हा मतलब साधावयाचा आणि उजाडण्यापूर्वीं किल्यावर परत यावयाचें, इतक्या गोष्टी करावयाच्या आहेत. तर रात्र थोडी आणि सोंगें फार असें होऊं नये. (महाराजांस राम राम करून) महाराज, आतां आह्मांला जाण्याची आज्ञा असावी. घाटगे तटावर सर्व तयारी करून वाट पहात उभे असतील.

किल्ले०—(राम राम करून) सरकार, शत्रूंचें नांव काढलें कीं माझ्या एकंदर शिरांतील रक्त उसळूं लागतें व त्यामुळें बेफामपणाचे व आवेशाचे शब्द केव्हां केव्हां तोंडून जातात, तर त्याबद्दल सेवकाला माफी असावी. चिटणिसांबद्दल यत्किंचितुही काळजी करूं नये. या

पायांची कृपा असली कीं, गेलेली कामगिरी बजावून पहांट होण्यापूर्वीं परत येथें ठेवलेले.

महा०—बरें जा; उभयतांही गेल्यासारखा कार्यभाग उरकून सुखरूप परत आलांत ह्मणजे स्वराज्यावर ईश्वराची अद्याप कृपा आहे असें मी समजेन.

खंडो०—होय; त्याच्यावर पूर्ण विश्वास ठेवून मनुष्य विचारपूर्वक यत्न करीत गेला, ह्मणजे तो फलदाता त्याचें सर्वदां साहाय्य करतो. बरें; येतों आतां.

( जातात व पडदा पडतो. )

## प्रवेश ४ था.

### स्थळ—बदामीजवळचें रान.

( हणमंतराव प्रवेश करितो )

हण०—(आपल्याशीं) काय करावें! घरीं काकूंची प्रकृति बिघडल्याबद्दल नागोजीरावांना जिंजी मुक्कामीं जरूरीचें पत्र गेल्यामुळें त्यांनीं मला मुद्दाम ह्मसवडापर्यंत जाऊन यावयास सांगितल्यावर नाहीं तरी कसें ह्मणतां येतें? नाहींपेक्षां या वेळीं गुत्तीस रामचंद्रपंताचीं काय काय कारस्थानें चाललीं आहेत तीं तेथें गेल्यानें समजलीं असतीं; व संताजी हल्लीं कोठें व काय करीत आहे, याचा गुप्तपणें मीं पक्का शोध काढला असता. तो बादशहाचें ह्मणणें मान्य करीत नाहीं हें तर आतां ठरलेंच. पण जिंजी सर होईपर्यंत तो मराठ्यांकडे परत न वळेल एवढें तरी धोरण राखणें जरू-

रीचें आहे. ह्मसवडाहून नागोजीरावांना जें पत्र गेलें त्यांत संताजी विजापूर प्रांतीं आपल्या लोकांसह हिंडत असल्याची बातमी लिहिली आहे. पण एवढ्यांत इतका दूर त्याचा पल्ला पोंचला असेल, असें संभवत नाहीं. वाटेंत मोंगलांचीं ठाणीं चोहोंकडे पसरलीं असतां व प्रत्येक मोंगल कामदार त्याच्या पत्त्यावर असतां कोणा- लाही त्याचा थांग लागत नाहीं, हें मोठें आश्चर्य! आश्चर्य तरी कसलें? काल बदामीहून निघतांना मुकरबखानाची जी स्थिति आपण पाहिली तसाच प्रकार सर्वत्र असल्यावर महाराष्ट्रांतून कर्नाटकांत व कर्नाटकांतून महाराष्ट्रांत जी मराठ्यांची निर्भयपणें सारखी रहदारी चालू आहे, तिला प्रतिबंध कसा हो- णार? बदामी ह्मणजे भर मध्यावरचें ठिकाण; ह्मणून मुकरबखानासारख्या हुषार व दक्ष सरदाराची नेम- णूक या ठिकाणीं झालेली. पण काय उपयोग? मिजासखोरपणा व निशा यांचा मोंगल सरदारांवर पूर्ण अम्मल बसलेला; तेथें त्यांना कर्तव्य कसें दिसणार! नाहीं- पेक्षां मराठे प्रत्यक्ष त्यांच्या हातावर तुरी देऊन निघून जातात ह्मणजे काय? आठ दिवसांपूर्वी लिंगसूर गांवा- हून वृंदा नांवाची कोणी एक मराठ्यांची स्त्री संताजी- चा तिला पत्ता असावा या संशयावर मुकरबखानानें कैद करून तिला आपल्या छावणींत आणून ठेविलें आहे, असें त्याच्याच नोकरांकडून मला कळलें. पण बोलावें कोणी! अशा दुसऱ्यांच्या बायका कैद करून आणिल्यानें संताजी हातीं लागता किंवा मराठेशाई मोडती तर आणखी काय पाहिजे होतें? स्त्रियांच्या

नादीं लागलेल्या सरदारांच्या हातून मराठ्यांचें पारिपत्य होणें शक्यच नाहीं. पण, फट ह्मणतां ब्रम्हहत्येचें पातक पदरीं घेण्यास तयार व्हावें कोणी, हा एक प्रश्नच आहे. कारण, मुकरबखान ह्मणजे बादशहाच्या गळ्यांतील केवळ ताईत असें ह्मणतात. कसें ही असलें, तरी ही स्थिति प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहून माझ्यानें स्वस्थ बसवत नाहीं. तेव्हां ह्मसवडाहून परत जिंजीस गेलों ह्मणजे झुल्फिकरखानाच्या कानावर या गोष्टी घालावयाच्याच. बरें; हा गांव तर जवळ दिसूं लागला. तेव्हां मुकामावर जाऊन मगच विश्रांति घ्यावी.

(जातो)

---

## प्रवेश ५ वा.

### स्थळ—जिंजीच्या किल्यावरील एक बुरुज.

( किल्लेदार व सर्जेराव घाटगे प्रवेश करितात. )

किल्ले०—सर्जेराव, गणपतराव शिर्के व त्यांचे बंधु यांनीं चिटणिसांना वचन दिल्याप्रमाणें ते आपल्या वचनास जागले, ही मोठी आनंदाची गोष्ट. त्यांनीं सांगितल्याप्रमाणें परवा रात्रीं महाराज, चिटणीस आणि उभयतां दाभाडे बंधु अशा चौघांना गुप्त रीतीनें पाळण्यांतून किल्याखालीं उतरून मी शिर्क्यांच्या गोटांत पोंचवून आल्यावर काल सकाळीं शिर्क्यांनीं शिकारीचें निमित्य काढून चौघांनाहीं आपल्या बरोबर वेल्लोरापर्यंत नेऊन सुरक्षितपणें पोंचविल्याची बातमी नुकतीच आली आहे.

तेव्हां चिटणिसांनीं रचलेला व्यूह निर्विघ्नपणें शेवटास गेला, असें म्हणण्यास आतां हरकत नाहीं. पुढें कांहींही होवो. शत्रूंची तोफ आजच जरी आतां किल्ल्यावर सुरू झाली तरी बेहत्तर.

सर्जे०—किल्लेदार, शिर्के बंधूंच्या साहाय्यानें आज मराठेशाई बचावली, ही फारच मोठी गोष्ट! थोरल्या महाराजांची पुण्याई जबर यांत संशय नाहीं. ही आनंदाची वार्ता सर्वांना समजली कीं, किल्ल्यावरील प्रत्येक मनुष्याला शत्रूशीं लढण्यास आतां दुजोरा येईल. एकंदरींत रामचंद्रपंतांचें धोरण, त्यांची मुत्सद्दीगिरी व महाराष्ट्रांत बसून त्यांनीं चालविलेली खटपट हीं विलक्षण होत! या राजकारणांत त्यांना यश येईल, असें कोणालाही वाटलें नव्हतें. बरें; पण महाराजांच्या कबिल्या विषयींची वाट काय?

किल्ले०—याबद्दल काळजी करावयास नको. झुल्फिकारखानानें जरी किल्ला सर केला, तरी त्या आपल्या आप्तांच्या स्त्रिया असें खानास सांगून व त्यांना सुरक्षितपणें त्यांच्या घरीं पोंचविणें हें आपलें कर्तव्य असल्यामुळें तसें करूं देण्याबद्दल त्याला आग्रहपूर्वक विनंति करून कबिले बिनधोक महाराष्ट्रीं पोंचवितों, असें शिर्के व मोहिते यांनीं कबूल केलें आहे.

सर्जे०—शाबास! चिटणिसानीं शिर्क्यांना इतकें अगदीं आपल्या मुठींत आणिलें अं!! असा कोणता मोहिनी मंत्र त्यांना साध्य झाला नकळे.

किल्ले०—सर्जेराव, चिटणिसांची स्वामिभक्ति आणि त्यांचा स्वार्थत्याग हाच त्यांचा मोहिनी मंत्र. त्यांची

परीक्षा पाहण्याकरितां शिर्के बंधूंनीं जेव्हां तुह्मीं आप-
ल्या सर्व वतनवाडीची सनद आमच्या नांवें करून
दिल्यास मग तुमच्या ह्मणण्याचा विचार करूं असें
ह्मटलें, त्याबरोबर बसल्या बैठकीला महाराजांच्या
जिवासाठीं आपल्या एकंदर उत्पन्नाची सनद चिटणि-
सांनीं शिर्क्यांच्या नांवें लिहून दिली, हें कांहीं साधारण
धैर्य नव्हे. फलाची अपेक्षा न धरितां कर्में करणारांना
ईश्वर देखील वश होतो ह्मणतात. मग मनुष्याची ती
कथा काय!

सर्जे०—किल्लेदार, खरोखरच ही चिटणिसांनीं
स्वराज्याविषयीं दाखविलेली कळकळ, स्वामिकार्यासाठीं
दिसून येणारें त्यांच्या ठिकाणचें हें मनौदार्य आणि
अप्रतिम निष्ठा फारच थोड्यांच्या अंतःकरणांत वागत
असतील. आपलेपणा राखण्यासाठीं स्वार्थावर पाणी
सोडून पाहिजे त्या संकटांत उडी घेणारे पुरुषच खरे
थोर, यांत संशय नाहीं. पण, रामोजीराव ह्मणजे अति-
तापट मनुष्य. त्याला कशाचीही व कोणाचीही पर्वा
नाहीं. तर अशा पुरुषाचेंही मन वळलें हें मोठें आश्चर्य!
गणपतरावासारख्यांची गोष्ट निराळी.

किल्ले०—घाटगेराव, रामोजीरावांनीं कमी नाहीं केलें
बरें! 'भोंसले कुलाची अब्रू राखणें तुह्मांकडे आहे'
इतके चिटणिसांच्या तोंडचे शब्द ऐकतांच ते वाघा-
सारखे चवताळून एकदम त्यांच्या आंगावर धांवले.
दुरुत्तरांची तर त्यांनीं लाखोली वाहिली! पण तें सर्व
सहन करून चिटणिसांनीं जेव्हां आपली मान पुढें

केली व ' संभाजी महाराजांनीं तुमच्या घराण्याचें शिरकाण केल्याबद्दल सूड घ्यावयाचा असेल किंवा त्यासाठीं भोंसले कुळाचा पुरा उपमर्द करवून मराठेशाई धुळीस मिळवावयाची असेल, तर महाराजांना शत्रूंच्या हातीं देण्यापूर्वीं आपल्या हातच्या तलवारीनें प्रथम माझें शिर उडवा आणि मग काय करावयाचें तें करा ' असें निर्वाणीचें भाषण करून पदर पसरला आणि स्वराज्याकरितां एवढी भीक घालाच अशी विनंति केली, तेव्हां रामोशीरावाचें अंतःकरण द्रवलें. नाहींपेक्षां त्यांचें तें नारसिंह स्वरूप पाहून माझ्या मनाचीही त्रेधा उडाली होती. बरें; ईशकृपेनें एका संकटांतून तर पार पडलोंच. तेव्हां आतां पुढील तजवीज काय करावयाची याबद्दल दिनकररावांना भेटून कायतो विचार ठरवूं चला. ( जातात )

## प्रवेश ६ वा.

( राधाबाई पलंगावर विचार करीत पडली आहे असा पडदा उघडतो )

**नागोजी०**–(पडद्यांत) तुह्मी आतां जा आणि सांगितल्याप्रमाणें खानाला भेटून माझा निरोप कळवा. (बाहेर येऊन) वा! आज इतक्यांत झोंप लागली वाटतें? ह्मणतात ना 'रावण जाणें सुकळ दुकळ दह्माभातास काय दुकळ'! आह्मांला सत्रा पंधरा विवंचनेमुळें आणि सरकारची कामेंकाजें चिनचोभाट कशीं

पार पडतील या काळजीमुळें अन्न गोड लागत नाहीं कीं झोंप कशी ती येत नाहीं. बायकांना त्यांतलें कांहीं आहे का! कधीं दागिना नाहीं ह्मणून रूस आणि कधीं मनाजोगी गोष्ट झाली नाहीं ह्मणून घुसफुस, बाकीचा राहिलेला वेळ झोंपेंत; असेंच कीं नाहीं? (पलंगाजवळ जाऊन) खरीच झोंप लागली आहे कीं आज बोलायचा वार नाहीं? (हालवून जागी करूं लागतो)

राधा०(चवताळून) निर्लज्ज्या, खबरदार जवळ येशील तर. तुझ्या हातांतील तलवारीला भिऊन मी शरण येईन असं समजूं नको. मी वीरपत्नी व निंबाळकरासारख्या धाराशूर वीराची मुलगी आहे, समजलास? पूर्वींचं वैर साधून तूं माझ्या सौभाग्यावर घाड घातलीस. आतां मला जिवंत राहून तरी काय करावयाचं आहे! तुजसारख्या उभयकुळांच्या हाडवैऱ्याच्या हातून मरण्यापेक्षां कपाळ आपटून जीव देणं बरं. अगचाई, या चांडाळानं तर मला अगदीं गांठलं! (पलंगावर कपाळ आपटते आणि खालीं पडते).

नागो०–( तिला सांवरून धरितो आणि डोळ्यास पाणी लावून ) आज वेड्यावेड्यासारखें काय बोलतेस हें! जागी झालीस का तूं आधीं? इतकें घाबरण्याजोगें आणि घामाघूम होण्याजोगें स्वप्न तरी कसलें पडलें! ( तोंडावरचा घाम पुसतो ) पुरती ध्यानावर आलीस का? प्रिये, मी जवळ असतां तुला इतकी भीति वाटण्याचें कारण तरी काय झालें सांग पाहूं! आधीं मजकडे पहा डोळे उघडून.

राधा०—( उसासा टाकून डोळे उघडते व थरथर कांपत ) छेः ! हा वेळपर्यंत मला काय झालं आणि काय नाहीं हें कांहीं सांगतांच येत नाहीं. ( पुन्हां घाब-रल्या सारखें करून. ) नकोग बाई पुन्हां त्या स्वप्नां-तील प्रसंगाची आठवण ! ! त्या दुष्ट चांडाळ घोरपड्याची ती रक्तानं माखलेली तलवार आणि तें त्याचं भयंकर स्वरूप अजून माझ्या डोळ्यापुढचं गेलं नाहीं. आणखी कांहीं वेळ जर इकड येणं झालं नसतं, तर माझी काय अवस्था झाली असती आणि काय नाहीं ! मी आतां चांगली जागी झालें आहे खरी; पण अंगांतील कांपरं नाहीं जात अझून. जगदंबे, तूंच बाई ह्या चुड्यांना आउक्ष देणार !

नागो०—स्वप्न पडलें, म्हणून असें कोणी भितें कीं काय वेड्यासारखें ! तो घोरपडा येथें येईल तरी कसा ? सिंहाच्या गुहेंत कधीं लांडगा शिरला आहे काय ? तरी मी हणमंतरावाला म्हणत होतों, कीं त्या दुष्ट वैऱ्या संबंधानें कोणतीही गोष्ट तुझ्या देखत काढूं नको म्हणून. कारण, भित्र्या स्वभावावर तशा गोष्टींचा भलताच परि-णाम होतो.

राधा०—( किंचित् रागाऊन ) सर्व कांहीं ठाऊक आहे. भित्रा स्वभाव म्हणून नको दुसऱ्याला वरचेवर हिणवायला. त्या हाडवैऱ्याची प्रत्यक्ष गांठ पडली अ-सती आणि तें त्याचं नारसिंह स्वरूप समक्ष पाहिलं असतं, म्हणजे समजलं असतं दुसऱ्यांना हंसायचं कसं तें ! खरा वाघ तो ! त्याच्या डुरकण्याला जर पुरुषासा-

रखे शूर पुरुष भिऊन दूर राहतात, तर बायका गर्भ-
गीळ झाल्या ह्मणून त्यांत मोठं हंसण्यासारखं नवल नाहीं.

नागो०—वाः! खूप छान!! ज्याचें धोंगडें त्या-
च्याच गळ्यांत अडकविण्याची विद्या मात्र बायकांना
चांगली अवगत असते! एकंदरींत तो घोरपडा ह्मणजे
वाघ आणि मी त्याच्या डुरकण्याला भिऊन दूर दूर
असतो, असाच कीं नाहीं तुझ्या बोलण्याचा मतलब?

राधा०—पुरे मेलं. कोणतं ही भाषण आपल्या
आंगावर ओढूनच घ्यायचं असलं ह्मणजे त्या भाषणाचा
अर्थ पाहिजे त्याला पाहिजे तसा करितां येतो. मतलब
कसला आला आहे त्यांत?

नागो०—मतलब नाहीं असें कसें होईल! वेडे, त्या
आपल्या हाडवैऱ्याला जगांतून नाहींसें करण्याचें मनांत
आणिलें, तर पळाचाही अवकाश नको. परंतु कोणतीहि
गोष्ट करणें ती विचारानेंच करावी लागते. तो आमचा
हाडवैरी असला, तरी शूर आहे. शिवाय, आह्मां उभ-
यतांचाही जन्म मराठ्यांच्या कुशीमध्यें झालेला. तेव्हां
अशा रीतीनें सूड उगवण्यापेक्षां दुसरे मार्ग आहेत.
बादशहा देखील तो आमच्या पक्षास मिळाल्यास त्या-
ला आपल्या पदरीं सरदारी देण्यास तयार आहे. पाहूं
काय काय होतें तें. तो जातो कोठें?

राधा०—ह्मणूनच ह्मणते, कीं एखादेवेळीं त्यानं बाद-
शहाचं ह्मणणं कबूल केलं आणि बादशहानं त्याला
सरदारी दिली, ह्मणजे मग त्याचा सूड घेणं कठीण

पडेल. कारण, मग त्याच्याशीं बरोबरीच्या व स्नेहाच्या नात्यानं वागण्याचा प्रसंग येईल.

नागो०—छेः! तो किती अभिमानी! आजपर्यंत पुष्कळ खपपट झाली; पण त्याचें मन मुळींच बदललें नाहीं. बरें, कदाचित् बदललें आणि तो जन्माचा हाडवैरी जाऊन जोडीचा सरदार झाला, तरी ही त्यांत वावगें कांहीं नाहीं.

राधा०—( गळ्यांतील हात काढून झिडकारते व दूर उभी राहून ) परदुःख शीतळ ह्मणतात तें कांहीं खोटं नव्हे. बायकांचा जीव वेडा ह्मणून पुरुषांना उगीच किंचित् त्रास कां झाला कीं त्या आपला जीव पाखड पाखड पाखडतात आणि त्यांना सुख तर आपण सुखी असं समजतात. पण बायकांना कितीही दुःख झालं किंवा त्रास झाला ह्मणून कोणी कधीं त्यांची वासपूस केली आहे का! त्या मेल्या ब्रह्मदेवानंच बायकांच्या कपाळीं तसं लिहिलं आहे, तिथं दुसऱ्यांना बोल लावून तरी काय उपयोग! जन्माच्या हाडवैऱ्याशीं स्नेह संपादून सुखी होण्याचं मनांत असल्यास वाईट तें काय? कोणी कडून तरी सुख झाल्रं ह्मणजे झालं! ज्याला दुःख होत असेल, त्यानं पहावा हवा तर आपल्या पुरता विचार! अन्नावांचून दिवस काढितां येतील; पण रात्रीच्या रात्री झोंपेवांचून कोण बाई काढील! हा वेळपर्यंत वाटलं होतं, कीं इतकं झाल्यावर तरी त्या वैऱ्याचा सूड घेणं खचित होईल. पण ती आशा आतां खुंटली. मग नित्य झोंपेत नाहीं नाहीं तें पहावं आणि चवताळून उठावं, अशा स्थितींत जगणं कोणाला बाई हवं झालं आहे!

यापेक्षां देवानं आज डोळे झांकले होते तें काय वाईट होतं ? शुद्धीवर आलें नसतें ह्मणजे सोन्यापेक्षां पिंवळं होऊन कोणालाच त्रास नसता.

नागो०—( जवळ जाऊन गळ्यांत हात घालतो. ) लाडके, तूं सहज बोलण्याला इतकी रागावशील असें मला वाटलें नव्हतें. तुला ज्या पासून सुख नाहीं, ती गोष्ट मला सुख देणारी कशी होईल ? पुरुषांचा खरा आनंद व खरें सुख काय त्या बायका. तसें नसतें तर झुल्फिकारखानाचा निरोप घेऊन इतका टांकोटांक मी कां बरें आलों असतों? त्यांतून तुजसारखी गुणी, सुशील व समंजस.... .......

राधा०—( गळ्यांतील हात काढून ) सगळं ठाऊक आहे; तोंडापुरतं बोलणं आणि मनाला येईल तसं करणं ! दुसऱ्याच्या जिवाला त्रास झाला ह्मणून उगीच कोण काळजी करतं ? ज्याच्या पोटांत दुखतं त्यानं ओंवा खावा हवा तर. ह्याडवैऱ्याशीं स्नेह झाल्यानं जर आनंद होत असेल, तर जन्माच्या स्नेहाची किंवा प्रेमाची मातबरी ती कसली !

नागो०—( पुनः जवळ जाऊन हनुवटी धरून ) प्रिये, रागावायचें ह्मणजे कुठवर ? त्याला कांहीं मर्यादा पाहिजे कीं नको ! झाली इतका वेळ थट्टा ! पण ही थट्टा तुला खरी वाटली तरी कशी ? हे पहा, हणमंतराव पुरता शोध करून येण्याकरितां गेला आहे. तो आला कीं पुढील तजविजीस लागलोंच ह्मणून समज.

तुझें स्वप्नांत देखील जर तो दिसूं लागला, तर आतां त्यांची उपेक्षा मी कशी करीन ?

राधा०—ही आपली माझी उगीच समजूत कीं यांत खरेपणा आहे ? सापाला दूध पाजून स्नेह संपादण्याचा उद्योग करायचा असेल, तर खुशाल होऊं द्या. त्यांत माझा कांहीं ना नाहीं. पण क्षणांत एक बुद्धि नको. नाहीं तर उद्यां पुनः कांहीं विचार मनांत आला कीं फिरला बेत.

नागो०—छेः! एकदां विचार ठरला तो ठरला. आतां त्यांत बदल होणें नाहीं. मला तुझ्या प्रेमापेक्षां अधीक असें या जगांत काय आहे?

राधा०—माझ्या गळ्याची शपथ हेंच खरं ना! बरं तर; मेलं दुष्ट स्वप्न पाहिलं आहे, तेव्हां त्याची इडापिडा टळण्यासाठीं तुळशीपुढं तुपाचा दिवा लावण्या करितां गेलं पाहिजे आधीं मला. ( जाते व पडदा पडतो)

राधा०—( पडद्याबाहेर येऊन ) आज हा असा स्वप्नाचा बाहणा केला, तेव्हा कुठ उगीच ' होय ' असं तोंडून निघालं. पुरुषांना वाटतं, कीं बायका ह्मणजे उतावीळ. पण हा उतावीळपणा देवानं बायकांच्या ठिकाणीं ठेविला नसता, तर पुरुषांच्या धिम्या स्वभावानं सगळं जग गाढ झोंपेंत घोरतच राहिलं असतं. थंडीनं कपाळ जड आणि सैरभैर झालं ह्मणजे त्याला सुंठ ही जशी मात्रा, तसा बायकांचा उतावीळ स्वभाव ही सारा दिवस विचार करकरून जड झालेल्या पुरुषांच्या आळशी स्वभावाला एक हटकून गुण आणणारी मात्रा

आहे. बायकांनीं कोणतीही गोष्ट काढली कीं ' त्याचा विचार केला पाहिजे ' हें मेलं पुरुषांचं ठरीव उत्तर. कसला इतका विचार असतो, देवाला ठाऊक! सारा जन्म जर विचार करण्यांतच गेला, तर हातानं करणी ती व्हावी कधीं! उभय कुळांच्या हाडवैऱ्याचा सूड उगविण्याची आयती चालून आलेली ही संधि फुकट गेली, तर असा योग पुनः कधींही जुळून यावयाचा नाहीं. आतां इतकं झाल्यावर बहुतेक मसलत फिरूं नये. तसा कांहीं रंग दिसलाच, तर पाहतां येईल पुनः! ( पडद्याकडे पाहून ) गिरिजे, घातलीस का बाई निरांजनांत वात? ( जाते. )

---

## प्रवेश ७ वा.

### स्थळ—चारखाळ्याचे रान.

( संताजी ओढ्याच्या कांठीं एकटाच विचार करीत बसला आहे. )

**संता०**—( आपल्याशीं ) अहाहा! काय सृष्टिसौंदर्य हें!! हा जिवंत ओढा मजसारख्या हजारों श्रांत जनांस नित्य तोषवून त्यांचीं प्रवाससंबंधीं दुःखें दूर करीत असल्यामुळें मोठमोठ्या पुण्यशील नद्यांपेक्षांही याची धन्यता मला अधीक भासते. पाणी कितीतरी स्वच्छ! तीरप्रदेशीं वाढणाऱ्या या आम्रवृक्षांस निर्मळ जलाचा नित्य सहवास असल्यामुळें हे वृक्ष देखील प्रवासी जनांस गार छाया देऊन त्यांचा दुवा घेतात.

सुष्टांचा किंवा दुष्टांचा जसा सहवास करावा, त्याप्रमाणें बऱ्यावाईट वासना आंगीं उत्पन्न होतात. तेव्हां हणमंतरावासारख्या आपमतलबी व कपटी मनुष्याच्या अल्प सहवासानें धनाजीच्या मनावर जो भयंकर परिणाम झाला, त्यांत कांहीं आश्चर्य नाहीं. धनाजी, थोरल्या महाराजांच्या हाताखालीं स्वदेशसेवा पत्करल्या दिवसापासून आज कैक वर्षें आपण अकृत्रिम भावानें वागत आलों, त्याचा असा हा शेवट झाला ना! शिवशिव!! मित्रा, माझा उत्कर्ष सहन न झाल्यामुळें शत्रूंच्या ठिकाणींही न शोभणारी कुडी बुद्धि तूं धारण केलीस आणि धन्याच्या व जनाच्या मनांत मजविषयीं अप्रीति उत्पन्न करून माझा मानभंग करण्यास प्रवृत्त झालास, हें मनांत आलें ह्मणजे अंतःकरणांत परमावधीचें दुःख होतें. मी तुझ्या उत्कर्षास आड येतों असें तुला वाटलें होतें, तर त्या नीच हणमंतरावाच्या नादीं न लागतां तूं मन मोकळें करून मजपाशीं गोष्ट काढतास, तर हें सेनापतिपद मी होऊन तुझ्या स्वाधीन केलें असतें. ह्या आह्मांमधील दुहीमुळें शत्रूस दुजोरा येऊन ते मराठेशाईच्या वाढीस लागलेल्या अंकुरावर कुठार चालविण्यासाठीं पुनः अस्तन्या सारून तयार झाले हें पाहून काळीज विरघळतें. पण काय करूं! प्रभो, हणमंतरावासारख्या विश्वासघातकी व कुलकलंक मनुष्यापासून हिंदुपदपादशाहीचें रक्षण कर. ( किंचित् विचार केलासें करून ) बरें; पण पिलाजी अद्याप कसा बरें आला नाहीं? जिन्नस घेऊन येण्यास इतका

विलंब लागूं नये. तो येईपर्यंत या ओढ्यांत आपण आपलें स्नान तरी आटपून घ्यावें. सर्वांग घामानें कसें चिंब झालें आहे.

(तलवार झाडाच्या मुळाशीं ठेवून पोषाख उतरूं लागतो)

नागो०–( आड राहून आपल्या लोकांशीं ) ठीक, आह्मांला जें हवें होतें तें अनायासेंच घडून आलें. ती पहा संताजीच्या हातची तलवार झाडाच्या आश्रयास बसली. आतां पोषख काढून तो ओढ्यांत स्नान करण्याकरितां उतरणार. फार उत्तम; आंधळा काय दोन डोळे मागतो ? बाबाजी, तूं व विठू दोघे तयार असा. तो ओढ्यांत उतरतो तों तुह्मी मागून हळूच जाऊन एकदम त्याच्या कंबरेस विळखा द्या. इतकें तुह्मी करतां तों मागून आह्मी सर्व तयार आहोंच. कामगिरी मात्र फार हुशारीनें पार पडली पाहिजे.

खंडू–त्याबद्दल काळजी नको. आमच्या हातून कोणत्याही तऱ्हेची कसूरी होणार नाहीं. मात्र त्याचे सगेसोबती किंवा सेवक कोठें आजूबाजूस उभे असतील तर भीति ! ह्याकरितां चारी दिशेला आपल्यापैकीं लोक पाठवून आधीं सर्व मार्ग रोखले पाहिजेत.

नागो०–खंडु, ती सर्व तजवीज पूर्वींच केलेली आहे. हं आतां उशीर नको. तो पहा स्नानाकरितां एका वस्त्रानिशीं ओढ्याकडे निघाला. बाबाजी, विठू, तुह्मी दोघे पुढें व्हा. करीम, तूं आधीं जाऊन त्याची झाडास टेंकून ठेविलेली तलवार आपल्या हातीं घे. झाली सर्व तयारी?

हणमं०—आतां विलंब कामाचा नाहीं. त्या हरामखोराला कंठस्नान घालण्याची हीच वेळ. विठू, निघाच. ( करीम पुढें जाऊन आधीं झाडास टेंकून ठेवलेली तलवार आपल्या हातीं घेतो. बाबाजी आणि विठू लपत छपत पाऊल न वाजवितां जाऊन संताजीच्या कंबरेस मिठी मारतात )

संता०—दगोर दगा!! अरे, मी स्नान करण्याकरितां निघालों असतां एकाएकीं कपटानें मजवर तुटून पडणारे तुम्ही कोण? ( हिसका हिसकी करून ) कमरेची मिठी सोडतां कीं पाठवूं तुम्हां दोघांनाही यमसदनीं? ( इतक्यांत दीन दीन करीत नागोजीराव व सर्व मंडळी येतात आणि त्याच्यास मुसक्या आंवळतात ) अरे, या दुष्टांनीं तर मला पुरें घेरलें! नीचानों, हा संताजी एकटा तुमच्या हातीं सांपडला असें वाटून तुम्हांला घमेंड उत्पन्न झाली असेल; पण संभाळा.

नागो०—( पुढें होऊन ) ओरड. आतां खुशाल तुझ्या हव्या त्या वल्गना चालूंद्यात. तुजसारख्या मोंगल बादशहाचा द्वेष करणाऱ्या हरामखोराला असेंच शासन मिळालें पाहिजे. घे आतां स्वराज्यसुख! दाखीव आतां तुझा पराक्रम आणि गमजा कोठें आहे तो!!

संता०—( त्वेषानें ) कोण नागोजी! तूं हा असा दावा साधलास काय? तरी मला वाटलेंच. अधमा, तुजसारख्या स्वराज्याची निंदा करणाऱ्याची जिव्हा कां नाहीं झडून पडली! तुला आपल्या पूर्वीच्या द्वेषाचा सूड घ्यावयाचा होता, तर माझी तलवार माझ्या हातीं

असतां समोर उभा राहून लढावयाचें होतेंस. अशी नामर्दपणाची कृति! हें शूराचें काम नव्हे.

नागो०—अरे, तुजसारख्या नीच मनुष्याला हेंच प्रायश्चित्त योग्य. तो प्रल्हादपंत जिवंत असेपर्यंत तुझी नव्हेती बडेजाव वाढवून त्यानें तुला सेनापतिपद देवविलें होतें ह्मणून तुला आपल्या शूरपणाची मोठी घमेंड वाटत असेल; पण तूं कितीसा पराक्रमी आहेस, हें या नागोजीला माहीत आहे. उगीच गुरगुरून व डोळे वटारून दुसऱ्यास भेडसावण्याला ही मराठ्यांची छावणी नव्हे, समजलास?

संता०—सर्व कांहीं मी समजून आहें. एकवार याला मोकळा सोडून पहा, घोरपड्यांच्या कुळांत जन्म घेणाऱ्यांच्या आंगीं कसें क्षात्रतेज असतें तें! तुजसारख्या बेमर्द शेंकडों गनीमांस धूळ चारून यमपुरीचा रस्ता दाखविण्यास एकटा संताजी पुरे आहे. विश्वासघातक्या, ही तुझी नीचपणाची कृति मराठ्यांच्या कुळांत जन्म घेणाराला मुळीच शोभत नाहीं. या आपल्या अधमपणामुळें तूं जो मराठ्यांच्या नांवाला काळिमा आणूं पहात आहेस, याचीं तुला शेंकडों जन्म फळें भोगावीं लागतील, याबद्दल माझ्या मनाला वाईट वाटत आहे. एरव्हीं, मी स्वराज्य स्वराज्य ह्मणून प्राण सोडण्यास केव्हांही तयार आहें!

हणमं०—संताजीराव, स्वराज्याचेपायीं मरण्यापेक्षां शरण येऊन औरंगजेब बादशहाची सेवा पत्करणें सुखाचें नाहीं काय? मग व्यर्थ कां प्राणास मुकतां! बादश-

ह्याच्या पदरीं सरदारी पत्करून मोंगलांच्या कल्याणा-साठीं मराठ्यांशीं लढण्याचें अभिवचन मिळेल, तर तुह्मी मला सुभेदारी दिली नाहीं तरी मी तुह्मांस बाद-शहाकडून सरदारी देववीन. बोला, त्यांत तुमचेंच हित आहे. आपला अपमान करणाऱ्या राजारामाचा सूड उगवावयास सांपडेल.

**संता०**—( दांतओंठ चावून ) अधमा, त्या पुण्य-प्रताप शूर पूर्वजांचा हा अस्सल व औरस वंश तुजसा-रखा बेवकूफ होऊन केवळ स्वहित साधण्यासाठीं घर-बुडवेपणाचें पातक पदरीं घेण्यास कधींही तयार होणार नाहीं. हीनसेवा पत्करून मेळलें अन्न खाण्यापेक्षां दरी खोऱ्यांत राहून कंदमुळें सेवन करीन व नशीबानें तुझ्या हातून सुटलों, तर आमरण स्वराज्यसेवेंत देह झिजवीन व स्वर्गसुखाचा अधिकारी होईन. 'शरण' हीं अक्षरें पुनः तोंडावाटें काढशील तर खबरदार! मी तुमच्या हातीं पूर्णपणें सांपडल्यामुळें हतवीर्य झालों आहे, असें मात्र समजूं नको. अशा स्थितींत असतांही हा संताजी खवळला तर ( त्वेषानें अंगावर धांवून ) तुझ्या नरडीचा घोंट घेण्यास चुकणार नाहीं, हें पक्कें ध्यानांत ठेव.

**नागो०**—हणमंतराव, मूर्खाला पढवून कधीं उपयोग झाला आहे? संताजी, ह्या तुझ्या वल्गना आतां व्यर्थ. कारण, तूं माझ्या हातचा येथून सुटशील असें मनांत देखील आणूं नको. तूं ऐकणारा मनुष्य नव्हेस; पण उगीच विचारून पाहिलें. आजपर्यंत इमानेइतबारें तूं

स्वराज्याची जी सेवा केलीस त्याचें भोग आतां फळ. आपल्या स्वामिभक्तीचा व मर्दुमकीचा टेंभा मिरविणाऱ्यांची हीच गत व्हावयाची समजलास?

करीम-( एकीकडे ) तोबा तोबा! संताजीकेजैसे शूर और जवामर्द सरदारकेउपर ऐसा बुरा वख्त आन पोहोंचा; फिर क्या करूं? नागोजीकेजैसा सैतान मालिकका मैं बंदा गुलाम हो चुकाहूं. आपने जातभाइके उपर हत्यार उठाना ये बडी अपसोसकी और बहोत शरमकी बात! कमजात मुसलमिन भी ऐसा बेहिमती काम नही करेगा. ( उघड ) संताजी, शीर सलामत तो पगडी पचास. इसवास्ते किस तऱ्हेभी आपका जान बचाऊंना ऐसा मेरा दिल चाहताहै.

हण०-संताजी, पुरे आतां हा हट्ट. हे सारे गुण उपळले तुमच्या हट्टी व हेकेखोर स्वभावानेंच; आणि अजून डोळे उघडत नाहींत याला काय ह्मणावें! आतां तो पोरटा दत्ताजी नाहीं आला कोठें तुमच्या दुःखाचा विभागी व्हायला? या वेळीं हा हणमंतरावच पडला तर तुमच्या उपयोगी पडणार. तेव्हां मी सांगतों तें ऐकून नागोजीरावापाशीं जीवदान मागा आणि बादशहाची नोकरी पत्करा; नाहींपेक्षां आतां प्राणाशींच गांठ!

संता०-( हताश होऊन ) धिक्कार, धिक्कार असो या माझ्या जिण्याला!! असे नीचाच्या तोंडचे वाग्बाण सहन करण्यापेक्षां धडापासून शीर एकदम वेगळें झालेलें पत्करलें. हे शब्द मर्मस्थान भेदून माझ्या काळजाचे लचके घेत असल्यामुळें त्यांच्या योगानें माझ्या

आंगांतील शिरानशीर व सारें रक्त आगीप्रमाणें तापून गेलें आहे. पण काय करूं! हाय हाय! राणोजी, दत्ताजी, तुह्मी यावेळीं कोठें बरें गुंतलांत? माझ्यामागें ईशकृपेनें तुह्मी जिवंत राहिलांत तर मजवर गुदरणाऱ्या ह्या दुष्ट प्रसंगाचा आजन्म विसर पडूं देऊं नका. बहिरजी, आतां तुझ्या भ्रातृप्रेमाला मी अंतरणार! राजाराम महाराज जरी या संताजीच्या निःसीम स्वामिभक्तीला विसरले, तरी तूं स्वराज्यसेवेला विसरूं नको. घोरपड्यां-च्या कुळाचें हें व्रत तूं जिवाप्रमाणें पाळलेंस ह्मणजे मी स्वर्गीं धन्य होईन. यावांचून मला दुसरें कांहींही नको.

बाबाजी—संताजीराव, आपल परान ऱ्हाइल तर समद; न्हाईतर त्या सवराजाला घेऊनशान काय करायचव! येड्यावानी सवराजापायीं मराया कोन बर तयार व्हइल? त्या भिकारड्या राजारामाची चाकरी करूनशान काय धोंड मिळनार हायती? औरंगजेबाच्या शिरमंतीह्मोर आज समद्या पिरथवीमंदी कुनीबी न्हाई बगा. इच्याभन अकशी इंदूरच! तंवा मी ह्मनतो, धनीसाब सांगत्यात त्ये ऐकूनशान म्वागल सरदार होन्याच कबूल कराना?

नागो०—बाबाजी, तो कुठला ऐकायला? सुख भोगण्याचें तरी नशीबीं पाहिजेना! उगीच त्याच्याशीं बोलत राहण्यांत आतां अर्थ नाहीं.

संता—वाहवारे सुख!! कुलकरंट्या, जातिद्रोह व देशद्रोह हीं अघोर पातकें जेव्हां तुझ्यापुढें उभीं राहून तुला यमपुरींतल्या अनंत यातना भोगावयास लावितील

तेव्हां तुला समजेल खरें सुख कशांत आहे तें! अशा सुखाला हा घोरपड्यांचा वंश भुकेलेला नाहीं हें पक्कें ध्यानांत ठेव. आपल्या स्वातंत्र्याला वणवा लागला असतां तो विझविण्याकरितां व संपूर्ण आर्यांची लज्जा राखण्याकरितां ज्या वीरकुलावतंस शिवरायानें अनेक कष्ट सोसून स्वराज्याचा पाया घातला, त्या भोंसले कुलाची व त्यांत जन्म घेणाऱ्या राजाराम महाराजांची निंदा ऐकून मला बरें वाटेल व मी मोंगलाची सेवा पत्करण्यास तयार होईन अशी तुझी समजूत असल्यास ती अगदीं चुकीची आहे. परकी लाथेनें झिडकारीत असतांही त्यांतच सुख मानून त्यांच्या पदरीं तूपसाखर खाऊन पुष्ट होण्याइतका तुजसारखा बेशरम व पाजी मी झालों नाहीं. हीं स्वराज्याच्या अन्नानें वाढलेलीं हाडें स्वराज्याकरितांच पिचतील. तीं तुजसारखीं गोतास काळ होऊन मला अधोगतीस कधींही नेणार नाहींत हें खुप समज !

नागो०—( संतापून ) अधोगति ! कुणाला ? तुला कीं मला हें आतां प्रत्यक्षच तुला दाखवितों. नीचा, घे आतां स्वराज्यसुख आणि कर जगाचा शेवटचा रामराम ! तूं कबूल झाला नाहींस तर तुझ्या ह्या शिराला दिल्लिपति औरंगजेबाच्या पायांवर घालून त्याजकडून मोंगलांची सेवा करावयास लावितों पहा.—( तलवार उगारून ) जय कालिके ! बोलो दीन ! बोलो दीन !!

( एकच गलबला उडतो व पडदा पडतो. )

---

## अंक ४ था समाप्त.

# अंक ५ वा.

## प्रवेश १ ला.

**स्थळ**—जंगलांतील रस्त्यावरचें एक देवालय.

( संताजीचा शिरच्छेद करून नागोजी व मंडळी बादशहाच्या छावणीकडे निघाली असतां वाटेंत रस्त्यावरील देवालयांत उतरतात )

**विठू**—( पाहरा करीत असतां ) हनमंतरावदादा, चांद उगावला कींजी, सरकारासनी उठवा. दीस आल्यावर तपत उन्हांतून चालन्यापरास थंडाच चालन बर.

**हण०**—( अंगास आळेपिळे देत उठून बसतो ) विठू, चंद्र बराच वर आला; मंडळींना उठविलेंच पाहिजे. आपल्या सरदारसाहेबांच्या कट्टच्या दुस्मानाचा शेवट होऊन त्याचें शिर हातीं लागल्यामुळें त्यांना आज निवांत झोंप लागलीशी दिसते. त्या भिकारड्या दत्ताजीला आपले लोक कैद करून बादशहाच्या छावणीकडे नेत असतां तो वाटेंत प्राणास मुकल्याची बातमी ऐकल्यापासून माझा जीवही आतां निश्चिंत झाला आहे. ( रुमालांत बांधून भाल्यास अडकविलेल्या शिराकडे बोट दाखवून ) विठू, आतां हें त्या दुस्मानाचें शिर बादशहास अर्पण केलें ह्मणजे तो संतुष्ट होऊन मानेसाहेबांचे खरोखर जयजयकार करील.

**विठू**—ह्ये काय इचारावं! पन त्यो वात्र आपली समशेर एकीकड ठेऊन आंगोळ कराया वढ्यामंदी उतरला ह्मनूनच आमासनी त्येच्याजवळ जान्याची छाती झाली. न्हाईतर कामगिरी लई बिकाट व्हती हनमंतराव!

बाबाजी—(जागा होऊन उठतो) बिकाट न्हव अक्शी जिवावरल काम व्हत नी काय विठोबा! कालच्या परसंगाची आठवन मी तर कदीबी न्हाई इसरनार.

पिलाजी—( उसाला टेकून आपल्याशीं ) काय करूं? हे या नीचांचे शब्द ऐकून काळजाला घर पडत्याती! ह्योच त्यो समद्या लंकला आग लावनार हनमंत! आतां अगदीं संशय म्हुन न्हाइला न्हाई. नागोजी आन ह्ये समद मारेकरी. पन आतां काई बोललों किंवा कमजास्त केल तर हा इश्वासघातकी हनमंतराव मला ओळखनार आन माझीदिकून धनीसाबाबानी गत करनार! तवां अस यरुथ मरन्यापरास जिवंत न्हाइलो, तर एक न्हाई एक दिस तरी या हरामखोराचा सूड घ्याया सांपडल! कांहीं झाल तरीबी हे च्वार निघून जाईपतुर तोंडांतून एक शबद बी न काढतां सवस्थ पडून न्हाव, ह्येच ठ्यास.

नागो०—( जागे होऊन उठून बसतात ) बाबाजी, हा पहा, चंद्र किती तरी वर आला! हणमंतराव उठले नसले तर त्यांना जागे कर आणि निघण्याची तयारी करा, उठा.

हण०—साहेब, मी उठून बराच वेळ झाला. पण आपल्याला गाढ झोंप लागली असावीसें वाटल्यावरून कशी हाक मारावी, या विवंचनेंत होतों.

नागो०—बरें; चला उठा तर. उगीच उशीर कां?

( सर्व निघण्याची तयारी करतात )

विठू—धनीसाब, कवांधरून मी ऐकतो, त्यो पल्याड

निजलेला परवाशी सुसकारे टाकटाकून ह्या अंगावरच त्या अंगावर आन त्या अंगावरून ह्या अंगावर करतोया. तंवा त्यो कोन आन अस करन्याच कारन काय असाव बर? हमी हत येन्याच्या अदोगरच तो येऊन निज-लाया. आपुन निजल्यावर मी नी विठू कालच्या गोष्टी बोलत होतो. ते आमच बोलन ऐकून शान त्यो वरचेवर उसासा टाकी. आतां हनमंतरान आन मी बोलत होतों, तंवाबी तसच !

हण०—तसें असेल तर तो कोण, कुठला, याची चौकशी केली पाहिजे. न जाणो, आपला पत्ता काढीत संताजीचा कोणी संबंधी किंवा सेवक या ठिकाणीं आला नसेल कशावरून !

नागो०—हणमंतराव, हा तुमचा उगीच संशय ! बरें, कोणी आला असला तरी त्याची इतकी भीति कसली? तो आमचें काय करणार !

हण०—साहेब, तो एकटा काय करणार हें दिसतेंच आहे. पण संशय आल्यावर त्याची निवृत्ति झाल्याविना पुढें पाऊल टाकणें योग्य नव्हे. भिंतीला देखील कान असतात अशी ह्मण आहे. शिवाय, कुठली गोष्ट कोणत्या पररयाला जाईल याचा शाहण्या मनुष्यानें केव्हांही नेम धरूं नये. ह्मणून ह्मणतों, त्याला उठवून चौकशी करावी.

नागो०—विठू, कोण आहे त्याला हाक मार. आणि जागा कर.

विठू—( जवळ जाऊन शिर अडकविलेल्या हातांतील भाऱ्याच्या दांड्यानें त्याला ढोंसतो ) अर ये निजनार,

कोन हायर? ( जागा होत नाहींसें पाहून ) इच्या मन कुंभकरून तर न्हवकी! इकत डोसल, तरीबी मेल्यावानी पडलाया!

नागो०—तो उठत नाहीं होय? बरें, तसाच निजूंद्या. बाबाजी, तुजजवळच्या काढणीनें तेथेंच त्याच्या मुसक्या आंवळून टाक. सकाळपर्यंत त्याला इकडे तिकडे हालतां येऊं नये. सकाळीं या रस्त्यानें कोणी येईल तेव्हां त्यानें याला सोडिलें तरी फिकीर नाहीं. हणमंतराव, आतां झालें कीं नाहीं?

हण०—कोणीकडून तरी त्याचा बंदोबस्त झाला ह्मणजे झालें. दुसरें काय!

( खंडू त्याच्या मुसक्या आंवळतो व सर्व निघून जातात. )

---

## प्रवेश २ रा.

### स्थळ—जमखिंडीजवळचा माळ.

( राजाराम महाराज एका झाडाखालीं निजले असतां शिवबा व खंडोजी दाभाडे पाय चेंपीत बसले आहेत )

शिव०—दादा, महाराजांचा डोळा लागला असावासें वाटतें. दोन घटका चांगली झोंप लागली, तर तितका थकवा कमी होईल. आतां येथून पन्हाळा विशेष दूर नाहीं.

खंडो०—दूर नसला तरी महाराजांच्या हातून आतां चालून पल्ला झेंपेल असें वाटत नाहीं. तेव्हां त्यांना येथून आपण पाठीगळीवरून न्यावें हेंच उत्तम. पण शिवबा, चिटणीस व धनाजीराव अद्याप कां बरें आले नाहींत? कांहीं विशेष कारण तरी नसेलना!

शिव०—छेः! त्यांच्याविषयीं इतकी काळजी करावयास नको. आजउद्यां इतक्यांत ते आह्मांस गांठतील. कदाचित् वृंदेला सोडवून आपल्या बरोबरच आणण्याचा त्यांचा विचार असेल.

खंडो०—शिवबा, यावेळीं ते वृंदेकरितां गुंतुन पडतील असें मला वाटत नाहीं. कारण, आधीं महाराज सुस्थळीं कसे जाऊन पोंचतील ही काळजी आह्मांपेक्षांही त्यांना जास्त आहे. तें तेवढें झालें ह्मणजे मग बाकीच्या गोष्टी.

शिव०—होय तें खरें. परंतु ज्या साध्वीनें स्वतांच्या अब्रूकडे किंवा जिवाकडेही न पाहतां केवळ स्वराज्याची अब्रू बचावण्याकरितां चिटणीसांची मसलत मान्य करून खानाची पट्टराणी होण्याचें कबूल केलें, तिच्या रक्षणार्थ आमची मदत जाण्यापूर्वींच जर मदांध झालेल्या त्या मुकरबखानानें तिच्या पातिव्रत्यावर धाड घातली तर संपूर्ण मराठेशाहीचा केवढा दुर्लौकिक!!

खंडो०—शिवबा, तसा दुष्ट प्रसंग येण्याची मुळीच भीति नाहीं. कारण, या सगळ्या गोष्टी लक्षांत आणून कोणत्या रीतीनें पुढें आठपंधरा दिवस काढावयाचे

ती युक्ति चिटणिसांनीं तिला सांगून ठेविली आहे. महाराज पन्हाळयास पोंचतांच पहिलें काम वृंदेची मुक्तता !

शिव०—दादा, या प्रसंगीं वृंदेचे महाराजांवरच नव्हेत, पण संपूर्ण महाराष्ट्रियांवर तसेच अनंत उपकार आहेत ! ती जरका या वळीं बदामीस मुकरबखानाच्या कैदेंत नसती तर चिटणिसांचे सारे यत्न निष्फळ होऊन आह्मां सर्वांस ब्रह्मपुरीयेथें बादशहाच्या छावणींत आयुष्याचे दिवस मोजीत बसण्याचीच पाळी आली असती. पण महाराजांवर ईश्वराची अद्याप कृपादृष्टि आहे ह्मणून निभावलें !

महारा०—( स्वप्नांत आपल्याशीं ) शाबास वीरा ! मुकरबखान तर प्राणास मुकला; परंतु तुला ही झालेली भयंकर जखम ! शिवबा पाण्याची पट्टी....हाय !! रक्त बंद होत नाहीं. मी किती अधम ! संताजी, या कृतघ्न धन्याची.... तूं स्वर्गाचा अधिकारी....मी मात्र....

खंडो०—( घाबरून ) महाराज, महाराज, जागे व्हा. हें काय? दुष्ट स्वप्न पडलें असलें तरी हे सेवक आपल्या करितां पाहिजे त्या संकटांत उडी घेण्यास तयार असल्यावर काळ देखील आपल्याकडे वांकड्या नजरेनें पाहूं शकणार नाहीं. मग मुकरबखानाची आपल्या मनाला भीति कां? शिवबा, महाराजांच्या डोळ्यांस आधीं पाणी लाव.

महा०—खंडोजी, पाणी नको नि कांहीं नको; मी आतां चांगला जागा झालों आहे. पण माझा प्राणदाता

व खरा स्वामिभक्त आतां माझ्या कसा दृष्टीस पडेल! संताजी, या तुझ्या कृतघ्न धन्याकरितां, छेः! धनी कसला! धनी ह्मणवून घेण्यास देखील हा योग्य नाहीं. अशा चांडाळाकरितां व्यर्थ फिरे प्राणास मुकलास!! मजसारख्या अधमाला शत्रूंच्या हातून देहांतशासन हीच शिक्षा योग्य होती!

शिव०—महाराज, आपला किंचित् डोळा लागलेला पाहून आह्मी मोठ्या आनंदांत होतों. पण पहातों तों हा त्याचा भलताच परिणाम! अशा ठिकाणीं संताजी-रावाची आठवण आपल्याला कां बरें झाली! विशेष कारण नसतां ते उगीच भीतीनें आपली छावणी सोडून निघून गेले, त्याला कोण काय करणार? त्याबद्दल आपण आपल्या मनाला लावून घेण्याचें कांहीं कारण नाहीं.

महा०—शिवबा, ती सर्वस्वी माझीच चूकी रे! असा एकनिष्ट सेवक पुनः कधींही जन्मणार नाहीं. हाय हाय!! किती तरी त्याचें माझ्या ठिकाणीं व स्वराज्याच्या ठिकाणीं अकृत्रिम प्रेम! खंडोजी, मला आतां जें स्वप्न पडलें त्यांत मुकरबखानानें आमचा पाठलाग करून तो मला कैद करून घेऊन निघाला असतां एकाएकीं संताजीनें त्याला गांठून त्वेषानें त्याजवर आपली तलवार चालविली. त्या वेळचे ते त्या खऱ्या स्वामिभक्ताच्या तोंडचे शब्द मी कसे विसरेन? संताजी, तुझें उपकारऋण मी आतां कसें फेडूं रे!!

खंडो०—महाराज, पण हें सारें झालेलें स्वप्नांतच ना? स्वप्नांत हव्या त्या असंभवनीय गोष्टी व हवा तो

प्रकार दृष्टीस पडतो. ह्मणून त्या कोणी खऱ्या मानतें कीं काय? आतां जर कदाचित् संताजीरावाबद्दल आपल्या मनाला वाईट वाटत असेल तर त्याला उपाय करितां येईल. आह्मी साताऱ्यास जाऊन पोंचल्यावर रामचंद्रपंत आहेत; त्यांच्या सल्लच्यानें संताजीरावाची समजूत करून त्यांना परत आपल्या छावणींत आणण्यास उशीर लागणार नाहीं. पण आपण असें औदासीन्य स्वीकारिलें ह्मणजे ह्या सेवकांचा धीर खचून काय करावें हें सुचत नाहीं. आपल्याला तर काळोख असला तरी झेंपेल तितका पल्ला झेंपलाच पाहिजे. वाटेंत फार वेळ विश्रांति घेत बसणें धोक्याचें आहे. तेव्हां हात जोडून या सेवकाची पायाजवळ एवढीच विनंति आहे कीं, पन्हाळ्यावर जाऊन पोंचेपर्यंत कोणत्याही प्रकारचा खेद मनांत आणूं नये. आपले पाय सुजले असल्यामुळें आह्मीं आपल्यास पाठींगळीवरून नेण्याचा विचार केला आहे. तर उठा, भवानीचें स्मरण करून वाटेस लागूं.

महा०—खंडोजी, चला मी तयार आहे. पण ह्या स्वप्नाचा विसर मला कसा पडणार! थोड्याशा विश्रांतीनें माझा थकवा बराच कमी झाला आहे. तेव्हां आतां माझ्यानें चालवेल असें वाटतें. नाइलाज झाला तर पाहतां येईल. माझा जीव तसाच तुमचा ना!

( चालूं लागतात. )

शिव०—( जातां जातां ) सरकार, आपला जीव बचावला ह्मणजे आमचें कांहीं झालें तरी आह्मांस त्याची बिलकुल पर्वा नाहीं. ( जातात. )

# प्रवेश ३ रा.

स्थळ—सोरापुरानजीकच्या रस्त्यावरील धर्मशाळा.

( नानासाहेब आपल्याशींच विचार करीत बसले आहेत )

नाना०—( स्वगत ) गुत्ती सोडल्यापासून अपशकुनानीं कां बरें अशी माझी पाठ पुरविली आहे! कांहीं अनिष्ट तर माझ्यापुढें वाढून ठेविलेलें नसेल ना? अहाहा! यावेळीं मजसारख्या चिंतातुरावांचून संपूर्ण विश्व विश्रांतिसौख्याचा अनुभव घेत असल्यामुळें केवळ आनंदानें डोलत आहे! शारीरिक किंवा मानसिक श्रमांचा व दुःखांचा विसर पाडून जीवमात्रास नित्य नवा उत्साह देणारी निद्रेसारखी अजब चीज ईश्वरानें निर्माण केली नसती, तर जगाची काय बरें अवस्था होती! त्या दयाळु विश्वंभरानें मनुष्याच्या सुखाचीं सर्व साधनें उत्पन्न केलीं आहेत. आह्मी मात्र मूढ व कृतघ्न; असल्यामुळें शुद्ध अंतःकरणानें नुसतें त्याचें स्मरण देखील करीत नाहीं. दुःखानें घेरलें, ह्मणजे तेवढ्यापुरती मनुष्यास त्याची आठवण होते; परंतु सुखांत रुळत असतां त्याच्या कृपेची, त्याच्या अनंत शक्तीची, किंवा त्याच्या ठिकाणीं असणाऱ्या अनुपम प्रेमाची आठवण होणारीं माणसें या जगावर किती बरें सांपडतील! स्वतांच्या कर्तृत्वाच्या, शहाणपणाच्या व ऐश्वर्याच्या धुंदींत सर्व जग तुच्छ मानणारांचीच संख्या फार. असो; पण येथें कोणी कण्हत असल्यासारखें

मवापासून काय बरें ऐकूं येतें! भूत, समंद यांपैकीं तर कांहीं नसेलना! ( लक्षपूर्वक कानोसा घेऊन ) छेः! या धर्मशाळेंत पलीकडे कोठें तरी पांथस्थ निजला असावा. होय; हें माणसाचेंच कण्हणें. ( मोठ्यानें ) अरे, येथें कोण कण्हतें आहे?

**पिलाजी**—दादासाब, मी एक वाटसरू हत पडलोया. काल सांजपारी या धरमशाळेंत येऊन उतरल्यापून अंगांत ठीक न्हाई. माज्या कण्हन्याचा आपल्यासनी त्रास होत असल. पन काय करूं? कंवा दिस उगवल अस झालया.

**नाना०**—( आपल्याशीं ) हा आवाज रडका असला तरी ओळखीचा दिसतो. पण पिलाजी येथें येण्याचा मुळीच संभव नाहीं. अजून काळोख आहे. तेव्हां चेहरा तरी कसा ओळखणार? तर याला आणखी कांहीं प्रश्न विचारून ओळख पटते का पहावें. ( उघड ) तूं कोण, तुझें नांव काय आणि तुला कोणीकडे जावयाचें हें सांगशील तर बरें होईल; अनायासें सोबत झाली.

**पिलाजी**—सातार्‍याची सोबत काय कामाची? आमच धनी गेल्याति सातार्‍याकड; तंवा तकडच मी चाललोया.

**नाना०**—( आपल्याशीं ) होय, हा पिलाजीच. आबासाहेबांनीं याला माझ्या शोधार्थ पाठविलें असावें. ( उघड ) तुझें नांव काय पिलाजी?

**पिलाजी**—( आपल्याशीं ) माज नांव ह्यसनी कस नर ठाव! आवाज अक्शी नानासाबावानी वाट-

तोया. धनीसाब तर नसत्याल! समजल कायले. ( उघड ) व्हय; मला पिल्या म्हनत्याती. पन माझ नांव अमूकच अस तुमासनी कस दक्कल?

नाना०—पिलाजी, तूं मला ओळखिलें नाहींस!

पिलाजी०—कोन नानासाब? आपल्यासनी मी इकता थोळ चांगलस वळखल न्हवत बगा! मलाबी जरासा अंदेसा आला. पन आपल्यासनी त्या न्वाड-ग्यांनीं धरूनशान कैदेंत टाकल्या अस मी ऐकल व्हत; म्हून मनामंदी संका आली.

नाना०—होय; पिलाजी, दुर्दैवामुळें बरेच दिवस मला शत्रूंच्या कारागृहांत कंठावे लागले. पण तेथून सुटल्यावर तुमचा पत्ता लागेना म्हणून मी गुत्तीपर्यंत गेलों होतों. पिलाजी, मला परत येण्यास फार दिवस लागले म्हणून आबासाहेबांनीं तुला माझ्या शोधार्थ इकडे पाठविलें वाटतें.? बरी गांठ पडली. नाहींपेक्षां चुकामूक व्हावयाची.

पिलाजी–( उसासा टाकून ) धनीसाब, आतां आमच्या गांठी पडल्या तरीबी सारखच आन न पड-ल्या तरीबी सारखच!

नानासा०—पिलाजी, या तुझ्या बोलण्याचा अर्थ काय आणि तूं उसासे कां टाकतो आहेस, हें कांहीं मला कळत नाहीं. नीट सांग; बाबा कोठें आहेत?

पिलाजी–( डोळे पुसूं लागतो ) धनीसाब, आतां आमच्या वांट्यास कुठल आल्याती थोरल धनी! ह्ये आमच करम खोट म्हुन त्या मान्यान दुस्मानगिरी

साधूनशान आमचा घात केला अन काय सांगूं धनीसाब! ( रडूं लागतो )

नानासा०—काय पिलाजी, आबासाहेब शत्रूंच्या हातीं लागले कीं काय?

पिलाजी—( किंचित् आवेशानें ) थोरळ धनी जिवंत असत आन त्यासनी नोडग्यांनीं जरी सातासमिंदरापल्याड नेल असत, तरी या भाडुरान त्यासनी सोडवून आणाया काय होवल्ये केल असत. पन काय बोलू धनीसाब! त्या घातकी हणमंतरावान नागोजीरावास आपलासा करूनशान त्येच्या हातून आमच्या परतापी सेनापतीसाबांचा घात करिवला किव! देवा देवा!! एका ओढ्यामंदी दोनपारच्या वेळीं आपळ थोरळ धनी जामानिमा उतरून सनान कराया उतरळ अस बगून नागोजीनं फारा दिसाच वैर साधळ आन एकाएकीं घाला घालूनशान त्या कसाबान आपल्या थोरल्या धनीसाबांच डोकस कापळ! त्या गोष्टीची याद झाली कीं, अंगाची अक्शी लाहीलाही उडतीया सरकार. पन आमच पराळब्ध खोट तत काय करनार! ( रडूं लागतो )

नानासा०—( दुःख आठवून ) दैवा, हायरे हाय! आबासाहेबांसारख्या वीरवरावर मी जवळ नसतां असा प्रसंग आणिलास काय! त्यांचा शेवट अशा भयंकर रीतीनें व्हावा आणि तो या राणोजीनें उष्ण अश्रु ढाळीत ऐकावा एवढ्या करितांच मला मागें जिवंत ठेविलेंस वाटतें! धिक्कार, धिक्कार असो या जन्माला!! हे वसुंधरे, ज्यांची रणभूमीवरील सिंहगर्जना ऐकून

लाखों शत्रूंनीं गर्भगलित व्हावें, अशा आबासाहेबांच्या अंगावर ज्या अधमानें हात उगारले त्याच्या अपवित्र देहाला तूं आपल्या पाठीवर थारा तरी कसा दिलास! शिव शिव!! आपल्या पुण्यशाली पूर्वजांनीं धारातीर्थीं देह अर्पण करून आजपर्यंत मिळविलेल्या यशाचा व कीर्तीचा लोप होऊन सर्वत्र यवनमय व्हावें अशीच त्या प्रभूची इच्छा आहे काय? आतां कसचें स्वराज्य आणि कशाचें स्वातंत्र्यसुख! हणमंतरावासारख्या कर्मनष्ट चांडाळाच्या दुष्कृतीचें फळ आतां संपूर्ण महाराष्ट्रियांस कांहीं काळपर्यंत तरी खचीत भोगावें लागणार! कारण, जिंजी सर होऊनही महाराज हातीं न लागल्यामुळें दांतओंठ खात असलेल्या मोंगलांस ही वार्ता समजली कीं, ते हर्षानें नाचूं लागून हिंदूंच्या रक्ताचे पाट वाहविल्यावांचून खचीत राहणार नाहींत. हाय हाय!! पण पिलाजी, तुजसारखा धन्याच्या जिवासाठीं जीव देणारा विश्वासु सेवक व दत्ताजी बरोबर असतां हा असा शोचनीय प्रकार कसा घडून आला बरें?

**पिलाजी**—सरकार, त्यावेळीं जर का हा बच्चाजी जवळ असता तर धनीसाबावर तलवार उगारनाऱ्याचा हात कलम करून सोडल्याइना व्हाताना. मग माझं कांहीबी झालं असतं, तरी बेहेत्तर व्हती. पन, धनीसाबापायीं हा जीव जावा, इकतं ह्या ल्योकाचं नशीब हायं कुटं? जेवनाचं जिन्नस आणाया मी गेलो गांवामंदीं, आन हकडं त्या मांगानं लई दिसांचा डाव साधूनशान घेतला बगा! दत्ताजीराव तर तकडं पाम-

नायकाकड गेल्यागुन त्येंच वरतमानबी न्हाई आमा-सनी. आन मी अस ऐकतो की त्ये वांकिनखेड्याहून माघार येत असतां वाटत न्वाडग्यांनीं त्यासनी गांठून त्येंचा परान घेतला. तंवा आतां दत्ताजीराव कुठछ येत्याल ?

**नाना०** काय पिलाजी, त्या नीचांनीं दत्ताजीचाही असा शेवट केला कायरे ! देवा, काळीज करपून टाक-णाऱ्या आणखी काय काय वार्ता या कानानीं ऐकण्या करितां या अभाग्याला जिवंत ठेवला आहेस नकळे !! पोटांत हा एवढा वणवा पेटला असून माझा देह अ-द्याप जळून खाक कां होत नाहीं ? हरहर !! दुर्दैवानें अशी सर्वप्रकारें पाठ पुरविल्यावर अविंधांच्या हातून पावलोंपावलीं होणारा अपमान सोशीत जगून तरी काय करावयाचें ! दत्ताजी, आबासाहेबांची ह्या लोकीं आ-पल्या हातून सेवा घडली नाहीं ह्मणून स्वर्गामध्यें तरी त्यांची शुश्रुषा करून उतराई होण्याकारितां माझ्यापुढें धांव घेतलीस काय ? आपण उभयतांही आजपर्यंत सख्या भावाप्रमाणें वागत आलों असून माझी कींव तुला येऊं नये हें माझें फुटकें नशीब; त्याला तूं काय करशील ?

**पिला०**—धनीसाब, आतां आपुन अन हा पिलाजी किती धाई धाई रडलों तरी यरूथून. आमी काईबी केल तरी गेलेले परान परत न्हाई येनार. तंवा हा उ-माळा गिळूनशान गुत्तीस जाऊं चला. तत काकासा-बासनी भेटून झोर काय करायच याचा इचार करूं.

रडत बसनं ह्ये तुमासारख्या शूरासनी न्हाई सोभत. अंगांत धमक असेल त्येनी करामत करून दावावी आन किरूत जोडावी. परालबदाला आल तस सोसनच भाग.

**नाना०**—( आवेशानें ) पिलाजी, समरंगणांत उभे राहून आह्मांशीं तलवार बहादुरी न करितां फितुरी सारखी नामर्दपणाची कृति करून शत्रूंनीं जो हा डाव साधला त्याबद्दल त्या नीचांचा सूड उगविण्यासाठीं हा शूराचा बच्चा, हा त्या वीरश्रेष्ठाचा अस्सल वंश सर्व ब्रह्मांड पालथें घालील व मराठेशाई रसातळास नेण्याच्या हेतूनें अविधांनीं जें हें कपटजाल पसरलें आहे त्याचे तुकडे तुकडे करून स्वर्गस्थ पूर्वजांना त्यांच्या रक्ताची तिलांजली दिल्यावांचून कधींही राहणार नाहीं. हाय! ( दांत चावून ) मान्या मान्या, बाबांच्या मागें ह्या घोरपडे कुळाचा कोणी त्राता उरला नाहीं किंवा तुझ्या काळजाचा डांस घेणारा कोणी अभिमानी पिंड राहणार नाहीं असें तुला वाटलें कायरे!! नीचा,......

**पिला०**—सरकार, आमच्या धनीसाबांचा जीव घेऊन तरी त्यो हरामखोर तुरूस झाला व्हय! न्हाई. आपली बोलबाला होवी म्हून त्येनं धनीसाबांच शिर कापूनशान मोंगलाकड न्हेल!! अव, असला करमचांडाळ मराठ्यांच्या कुळींत उपजला नसता, तरीबी लइ ठ्येस ठ्येस व्हत!

**नानासा०**—पिलाजी, नकोरे नको! काळीज विदारण करणारे ते शब्द मुखानें परत उच्चारूं देखील नको. ( दांत ओंठ चावून ) काय करूंरे? सर्वांगाची लाही लाही उडून

हे रोमांच पहा कसे ताठ उभे राहिले आहेत. बाबा, तुह्मांबद्दल सूड घेण्यासाठीं व तुमचे शेवटचे हेतु पुरविण्यासाठीं मी आतां ब्रह्मांड पालथें घालीन, शत्रूंच्या रक्ताच्या नद्या वाहवीन, समशेरीच्या आघातासरशीं संपूर्ण मोंगलपादशाही धुळीस मिळवीन व त्या कृष्णसर्पावर गरुडाप्रमाणें झडप घालून मान्याचें कुळ जगांतून नाहींसें करीन! इतकें सर्व होईल खरें; पण अंतकाळीं तुमच्या देहाचे झालेले हाल, घोर यातना, कशा नाहींशा होतीलहो!! पिलाजी, माझ्यानें आतां जास्त बोलवत नाहीं. चल; ज्या चांडाळानें शूराला अनुचित असें कर्म करून कपटानें डाव साधला त्या नागोजीचा देह खरख करीत असलेल्या या हातांनीं खेचून कधीं उलथापालथा पाडीन व त्याच्या नरडीचा घोंट घेऊन पितृऋणांतून कधीं मुक्त होईन तो सुदीन! प्रभो, ही माझी प्रतिज्ञा शेवटास नेणारा तुजवांचून कोणीही समर्थ नाहीं. सूड, सूड, सूड!!!

( जातात )

---

## प्रवेश ४ था.

### स्थळ—गुत्ती शहरांतील एक रस्ता.

( नानासाहेब, पिलाजी व त्रिंबकराव प्रवेश करितात )

नाना०—त्रिंबकराव, काकासाहेबांचा अनावर शोक

व त्यांच्या अंतःकरणांत वरचेवर येणारे भ्रातृवियोग दुःखाचे उमाळे माझ्यानें पहावेनात; व ह्मणूनच मी मोठ्या कष्टानें त्यांचा कसाबसा एकदांचा निरोप घेतला. आज जास्त सैन्य आपल्याला मिळण्यासारखें नसलें तरी हरकत नाहीं. पांचशें घोडेस्वार आणि चारशें शूर शिपाई इतक्या सामुग्रीवर आपण संपूर्ण पादशाही पालथी घालूं शकूं. मग मुकरबखानाच्या छावणींत पांचहजार सैन्य असलें ह्मणून त्याची पर्वा कसली! सूड! आम्हीं त्या हरामजाद्या मान्याचा सूड!! माझ्या डोळ्यापुढें नुसता सूड दिसतो आहे त्रिंबकराव!

**त्रिंबकराव**—हें काय विचारावें? रात्रंदिवस, निजतां, बसतां, उठतां डोळ्यापुढें तो अधम दिसणें किंवा त्याचा खासा सूड उगवून पितृऋणांतून कधीं मुक्त होईन अशी आपल्या जिवाला तळमळ लागून रहाणें साहजीकच आहे. या हानीबद्दल, या अपमानाबद्दल, शत्रूंचा सूड घेण्याचे कामीं गुत्तींतील आबालवृद्धांचें रक्त उसाळ्या मारूं लागलेलें पाहून मला तर असें वाटतें, कीं आपले हे चवताळलेले व घोरपडे घराण्याच्या लौकिकाकरितां जिवावर उदार झालेले पांचशें लोक पांचहजार मोंगलांचा नकशा उतरून त्यांना मुठींत नाकें धरावयास लावितील इतकेंच नव्हे; तर यावेळीं त्यांच्यापुढें पन्नास हजार मोंगल देखील कःपदार्थ आहेत!

**पिलाजी**—तिरिंबकरावदादा, आपुन ह्मंगालात त्ये अक्शी खर बगा. न्वाडग्यांचा सूड घेन्यापायीं आपल्या लोकांच्या अंगामंदी इकता हुरुप चढलाया, की

हुकुम न झालेले शिपाई ह्या सवारीस निवन्यापार्यी हुकूम झालेल्या शिपाईगड्यांना 'तुमी काइबी निमित्त करून न्हावा आन तुमच्या बदला आपुन जातो' अस सांगसांगून आग्न्यत्र कराया लागल्याती न्हवका! तंवा मुकरबखानाची कितीबी मैंदाळ फोज असली तरी आपल ह्ये कुरुष झालल गडी न्वाडग्यासनी कोंबड्यावानी चरारारा कापुन काढत्याल आन काय! इच्यामन ( कंबरेची तलवार उपसून ) माझ्या ह्या आईलाबी लइ दिस उपास झालाया! तंवा धनीसाब, हिला तिरुप्त करन्यापार्यी हा पिलाजी तर अक्शी ह्यादेवाचा अवतार घ्येनार! उगवत्याकड कंवा तांबड फुटल आन आपुन कंवा निगूं अस ह्या ह्याताऱ्याला झालया.

नाना०—पिलाजी, तूं कांहीं कमी नाहींस. पांचवी बरोबर समशेरीला पुजलेला गडी; मग कमी कां करशील! पण त्रिंबकराव, तो नराधम मान्या यावेळीं मुकरबखानाच्या छावणींत असल्याबद्दल जी बातमी आपण आणविली ती खरी तरी असेल ना? ( दांत ओंठ चावून ) एकदां त्या नीचाची व माझी गांठ मात्र पडली पाहिजे. कुलांगारा, तूं कोठें लपशील! त्या तुझ्या नीच कृतीचा चरका या अंतःकरणाला बसून काळजाला झोंबलेलें वीष तुझ्या रक्तपानावांचून खचीत उतरणार नाहीं.

त्रिंब०—नानासाहेब, त्या नीचाच्या अधमपणाच्या कृतीनें आपल्या एकाच्याच नव्हे, पण संपूर्ण महारा-

स्त्रियांच्या अंतःकरणास मोठा चरका बसून गेला आहे. पण वेळ आली पाहिजे ना! हणमंतरावासारख्या ज्या बेइमान व आपमतलबी मनुष्याच्या नादीं लागून मान्या अशी नामर्दपणाची कृति करण्यास तयार झाला त्याच्या व त्याच्याबरोबर या नीचाच्या पापाचे घडे भरले म्हणजे मग क्षणाचाही अवकाश नको. आपण आणिव-लेली खबर शेंकडा नव्याण्णव हिश्शानें खरी आहे. कारण, मुकरबखानाच्या बेहोषपणामुळेंच महाराज वगैरे मंडळी बदामीहून सुटून गेली असें बादशहाला खात्रीनें वाटलें असलें पाहिजे; व तेवढ्यासाठींच त्या महासंग्रामी औरंगजेबानें मुकरबखानावर वचक राहण्याकरितां नागोजीची तेथें कांहीं दिवस नेमणूक केली असावी. शिवाय,—सर्व जगाच्या दृष्टीनें कमकुवतपणाचीच—पण बादशहाच्या दृष्टीनें ही शूरपणाची कामगारी मान्याच्या हातून बजाविली गेल्यामुळें बादशहाचा आपल्यावर मुसलमान सरदारापेक्षांही जास्त विश्वास आहे असें त्याच्या मनाला वाटावें हा ही त्याची यावेळीं मोठ्या दुर्गाच्या जागीं नेमणूक करण्यांत औरंगजेबाचा हेतु दिसतो. मतलब साधण्यासाठीं बादशहा काय पाहिजे तें करील!

( इतक्यांत हवालदार व शिपाई एका बैराग्या-
च्या मुसक्या आंवळून त्याला खेंचीत
घेऊन येतात. )

**हवाल०**—तूं काय खरें असेल तें सारें सामोपचारानें सांगितलेंस तरच जिवंत सुटशील; नाहींपेक्षां तुला

येथेंच रामेश्वर भेटवितों समजलास! गांवांतील चोरी संबंधानें तुला कांहीं माहीत असो अगर नसो; पण तुझा सोबती आणि तूं सरकारी वाड्यांतील बातमी काढण्याकरितां काय काय प्रयत्न चालविले आहेत व नानासाहेबाशीं तुला काय करावयाचें आहे तें बोल. धर्मशाळेंतील बाकीच्या बैराग्यांनीं तुझ्याविषयीं जो संशय सांगितला तो अगदीं बरोबर असल्याबद्दल आतां माझी बालंबाल खात्री झाली आहे.

बैरागी—हवालदारसाहेब, दत्तात्रे तुमारा भला करेंगा! मेरा दोस्त कोई नही और तुमारे सरकारके वाडेमीकी बात मै किसीपास पुछी नही. नानासाब कोन और उसका तलास ये बैरागी किसवास्ते करेगा? गरीब बैरागीका इसतऱ्हें जान लेनेसे तुमकू कुछ मिलनेका नही.

हवाल०—हरबा, हा चवदाव्या रत्नाशिवाय कबूल होईल असें मला वाटत नाहीं. अट्टल रामोशी दिसतो! हा शत्रूकडील कोणीतरी बातमीदार असून या वेशानें येथें आला असावा.

शिपाई—कायर गाढवीच्या घसा! तूं कोन आन हत कशापाई आलायास ह्ये समद बोलतूयास (लाथ उगारून) का मारू कमरत लाथ आन द्येऊ म्हारुतिवानी मुसकाट फिरवून!

हवाल०—हरबा, त्याला वाड्याकडे घेऊन चल. तेथें सरकारासमक्षच काय काय ती त्याची शोभा करूं. (नानासाहेब आलेले पाहून) अरे ते पहा,

धाकटे सरकार इकडेसच येत आहेत. बरें झालें. ( नानासाहेबांस रामराम करून ) सरकार, आह्मी गांवांतील चोरीसंबंधानें तलास काढण्याकरितां धर्मशाळेंत गेलों होतों. तेथें चौकशी करितांकरितां आह्मांस असें समजलें कीं हा बैरागी व याचा एक साथीदार वाड्यांतील हरएक गोष्टीसंबंधानें नित्य बातमी घेत असून आपल्या संबंधानेंही ते चौकशी करीत असतात. तेव्हां हे चोर नसले तरी शत्रूकडील कोणी गुप्त हेर असावेत. याचा सांथीदार कोठें गेला आहे तें हा सांगत नाहीं. ह्मणून आह्मीं याला घेऊन निघालों होतों वाड्याकडे.

नाना०—हवालदार, हा बैरागी तर ओळखीचा दिसतो. अंगाला राख फांसून यानें जटा बांधल्या आहेत खऱ्या; पण या याच्या जटेंत भयंकर कृष्णकारस्थान लपलेलें असावें हा तुमचा अदमास अगदीं बरोबर आहे. ( नीट निरखून पाहून ) वा! हणमंतराव, खूप खाशी!! मात्रागमनी हरामखोरा, आज तुझ्या पापाचे घडे भरले अं! तुझें प्रारब्ध वाहुटळींत सांपडण्याला इतके दिवस लागले नव्हे!! त्रिंबकराव, बाबांनीं दूध पाजून वाढिवलेला व सुभेदारी न दिल्यामुळें शेवटीं फूत्कार करून त्यांच्याच अंगावर उडी टाकण्याकरितां तयार झालेला कृष्णसर्प तो हाच! ( जोरानें मुस्कटांत लगावून ) नीचा, तुझे दांत पाडून पोतडींत घालणारा गारोडी तुला आजपर्यंत कोणी भेटला नाहीं; ह्मणून तूं आपल्या जलाल गरलानें संपूर्ण महाराष्ट्रियांच्या काळजाची अशी आग आग करून सोडलीस!!

त्रिंब०—धनाजीरावांच्या मनांत महत्वाकांक्षेचें बीं पेरून आपसांत दुही, मत्सर, यादवी माजविणारा व स्वराज्यसेवेस कंटाळून परक्यांच्या गुलामगिरींत भूषण मानणारा नराधम हणमंतराव तो हाच काय? हाय! जातभाईंच्या माना परक्यांकडून कापवाव्यात व त्यांनीं चघळलेले तुकडे खाऊन ढेंकर देण्यांत आनंद मानावा, यापेक्षां जास्त बेशरमपणा तो कोणता!

पिला०—( हणमंतरावानें खालीं घातलेली मान वर करून ) सरकार, ह्यो ह्योच त्यो मांग! धनीसाबासंग वैर धरून त्या मान्याला सामील होऊनशान ह्यनंच इकता अनरथ उडिवला. व्हावार पापोस! आतां खापरावानी तोंड कराया काय झालंर? तंवा शोफारूनशान किरूत करतांना कुट गेली व्हती अक्काल! ( तलवार उपसून ) सरकार, बेऊं ह्या निर्लज्जाच परान आन देऊं याला त्या यमराजाच्या लोकांत नरक भोगाया धाडून?

नाना०—नको नको. अरे, असा त्याचा एकदम प्राण घेतल्यानें त्याच्या कृतकर्माची त्याला भरपाई कशी मिळणार? त्याच्यासाठीं यमानें मुद्दाम अत्यंत भयंकर असा नरक तयार करून ठेविला असेल खरा; पण या लोकच्या त्याच्या यातना संपल्यावर मग यमयातना! हवालदार, याला वाड्यांत नेण्यापूर्वी गाढवावर बसवून याची गांवांतून आधीं धिंड काढा आणि मग सव्वा मणाची बेडी याच्या पायांत अडकवून खाळखुळ वाजवीत व पाठीवर कोरडा ओढीत काकासाहेबांच्या समोर घेऊन या. प्राण न जाईल एवढी

तजवीज राखून याला पाहिजे ती शिक्षा केलीत तरी ती थोडी आहे! चला आह्मी आलोंच मागोमाग.

हणमं०—नानासाहेब, मी सर्वस्वी तुमच्या हातीं सांपडलों आहे. माझ्या जिवाचे आतां मालक तुह्मी हें मी जाणतों. तुमचे मीं अनंत अपराध केले आहेत खरे; पण आपल्याला मी हात जोडून आतां एवढीच विनंति करितों कीं मला तोफेच्या तोंडीं द्या, तरवारीनें माझें एकदम गर्दन उडवा किंवा उरांत जंबिया भोसकून काळजाचें विदारण करा. त्या कोणत्याही शिक्षेस मी पात्र आहे. परंतु, व्यर्थ माझ्या जिवाचे हाल मात्र करूं नका.

हवा०—( कंबरेंत लाथ मारून ) हाल नाहीं, तुझी आतां चांगली पूजा करतों चल. अहारे कुलदीप! महाराष्ट्राच्या विघातक!!

हणमं०—ओय, ओय, ओय! ( मटकन् खालीं बसून ) कंबरेचा कांटा दिला झालाहो!! ( कपाळास हात लावून ) दैवगतीपुढें कोण धांव मारणार! देवा, कायही माझी दुर्दशा!! नको हा जन्म!

पिला०—माकडीच्या, अस बंगाळ घरबुडवेपणाच काम कर म्हुन सांगाया देव आला व्हता व्हय तुजा घरीं चालून! करम खोट त्येच भोग फळ!

नाना०—हवालदार, जा आतां त्याला घेऊन. पिलाजी, तूंही त्यांच्याबरोबर वाड्यांत जा. आह्मी पागेकडे जाऊन उद्ईक निघण्याची सर्वांची तयारी आहे कीं नाहीं पाहून येतों. पुढच्या कार्याचें हें गणपतीपूजन तर झालेंच. सूड, सूड!! ( जातात )

पिला०—हवालदार, कस घेतलया चोरान स्वांग बगाना जी! दावा त्याला अवदाव रतन आन उठवा. (हवालदाराच्या हातांतील काठी घेऊन हणमंतरावाच्या पाठीवर ओढतो.) हरामखोर, ऊठ आतां ऊठ; न्हाईतर पाठीची चामडी लोंबलीच म्हुन समज

हणमं०—( उठून रडत ) भगवन्, नशीबानें पुरें घेरलें! आतां हे कसाब माझे पुरे हाल करणार हो!! दुर्दशा, पुरी दुर्दशा! ( सर्व जातात )

---

## प्रवेश ५ वा.

### स्थळ—बदामीयेथील मोंगलछावणी

( नानासाहेब त्रिंबकराव वगैरे मंडळीसह प्रवेश करितात )

नाना—त्रिंबकराव, ते पहा शत्रूंच्या छावणींतील दिवे दिसूं लागले. आतां येथूनच हल्ल्याची तयारी करून एकदम छापा घालावा हें उत्तम. रात्र फार थोडी राहिली आहे. दोन अडीच घटकेंत सर्व कांहीं उरकलें पाहिजे. तेव्हां तुह्मी व भवानराव सर्व फौजेनिशीं डावीकडे वळून उत्तरेच्या बाजूनें हल्ला करा. तुह्मी मुकरबखानाला गांठतां तों मी त्या दगलबाज हरामखोर मान्याच्या छातीचें विदारण करून तुमच्या मदतीस येतों. फुटाच, आतां उशीर नको. अद्याप जिकडे तिकडे सामसूम दिसतें आहे तोंच पहिल्या नडफे सरशीं निम्मीशिम्मी शत्रूंची फौज धुळीस लोळविली पाहिजे. मी तर हा निघालों. ( जाऊं लागतो )

त्रिंब०–( नानासाहेबांस मागें परतवून ) सरकार, आपल्याला आह्मीं एकटे कसे जाऊं देऊं! इतका उतावीळपणा व तो युद्धाचे कामीं मुळींच उपयोगाचा नाहीं. आपली भीष्मप्रतिज्ञा शेवटास नेण्यास आपण एकटे असमर्थ आहांत असें माझें ह्मणणें नाहीं. परंतु वेळ आहे, प्रसंग आहे; तेव्हां विचारानें कोणतीही गोष्ट करावी हें चांगलें. भवानराव निम्मी फौज घेऊन आपल्या बरोबर येतील. निम्मी फौज माझ्या बरोबर असली ह्मणजे असल्या एक नव्हे पन्नास मुकरबखानास मी बांधून आणीन.

नाना०–छे:! त्या कर्मनष्ठ चांडाळाचा सूड मी एकटा घेणार. त्याकामीं मी यत्किंचितूही कोणाचें साहाय्य घेणार नाहीं. एवढी माझी हुकमी समशेर माझ्या हातांत असली ह्मणजे मान्यासारखे शेंकडों नव्हे हजारों बदमाष गनीम माझ्या अंगावर तुटून पडले, तरी हा राणोजी त्या सर्वांना गति देण्यास समर्थ आहे. सूड, सूड!! मी त्या हाडवैऱ्याच्या, त्या गुलामगिरीच्या अन्नानें पुष्ट झालेल्या अधमाच्या छातीवर केव्हां लाथ मारतों हें पाहण्याकरितां बाबा मघांपासून एकसारखी मजकडे टक लावून बसले आहेत. ऐका, ती त्यांची शेवटची निराशेची किंकाळी माझ्या कानांत घुमधुमूं लागली! हाय! बाबा, बाबा, मी सूड घेतल्यावांचून तुमच्या आत्म्याला शांति नाहींहो मिळणार! हा पहा निघालों! सूड, सूड, सूड!!! ( निघून जातो )

त्रिंब०–भवानराव, आपले सरकार तर कोणाचेंही

न ऐकतां एकटे निघून गेले. त्यांच्या अंगांत सूड संचारल्यामुळें ते आतां प्रळय उडविल्यावांचून खास राहणार नाहींत. पण त्यांना असे एकटे जाऊं देणें बरोबर नाहीं. तेव्हां तुम्ही तीनशें घोडेस्वारांची तुकडी घेऊन त्यांच्या पाठीवर असा. आम्ही मुकरबखानास कैद करून सरकारच्या भेटीस घेऊन येतों. पण येथून निघण्यापूर्वी सर्व लोकांना माझें एवढेंच सांगणें आहे कीं, गनिमांनीं आबासाहेबांचा केलेला वध व त्यामुळें सर्व महाराष्ट्रीयांचा झालेला अपमान याची तुम्हांला कांहीं शरम वाटत असेल किंवा ज्यांनीं पादशाही-सरदारी व त्यापासून प्राप्त होणारें सुख यांस लाथ मारून आपली मान शत्रूंच्या हातीं दिली पण स्वराज्याचा मान जाऊं दिला नाहीं त्या घोरपडे कुळाचा अभिमान तुमच्या मनांत वागत असेल, तर छातीशीं छाती भिडवून गनिमांचा पुरा समाचार घेईपर्यंत हातांतील समशेरीस मुळींच विश्रांति देऊं नका. एक सूड किंवा मृत्यु यावांचून शत्रूंची छावणी कोणीही सोडावयाची नाहीं, हें पक्कें ध्यानांत ठेवा. चला. ( पडद्यांत बंदुकीचे बार झालेले ऐकून ) अरे, पण हे बार कुठले? शत्रूंना कांहीं चाहूल तर लागली नसेल ना! बरें; लागली असली तरी हरकत नाहीं. त्यांचा काळ जवळ आला आहे. चला, आतां विलंब नको. म्हणा हरहर महादेव आणि रचा गनिमांच्या प्रेतांचे ढीग. सूड, सूड!! (हरहर महादेव अशी गर्जना करीत निघून जातात.)

## प्रवेश ६ वा

( शत्रूंची कत्तल उडवून म्हादजी आणि सुभान्या प्रवेश करितात. )

सुभा०—म्हादजीराव, कशी गेलीया उडून छावनीभर हाय हाय! ह्या मुसांड लढन्याच्या कामापरास रडन्यांतच लई सूर. म्यां तर दोन इसा बोकड लोळावल असत्याल बगा! गुत्तीहून निघतांना ह्ये खरपाटन पाजळल्याच आज सारतुक झाल इच्यामन. पन कायव म्हादजीराव, त्यो मुरदाडखान छावनी सोडूनशान अदोगरच गेलाया म्हन! आन त्ये दुसर म्हराठ गडी कोन असत्याल बर? आपल्या फौजपैकीं तर खास न्हव. त्यनीबी न्वाडग्यांची लई घुळपाट उडवून दिली अन काय राव! त्ये कोन ह्ये मातुर कळल न्हाई.

म्हाद०—अरे, ते साताऱ्याहून आलेले महाराजांच्या फौजेंतील लोक. आह्मी छापा घालण्यापूर्वी आह्मांला जे बार ऐकूं आले, ते त्यांचेच. तेही मुकरबखानाला कैद करून नेण्याच्या उद्देशानें आले असून त्यांची व आमची हल्ल्याची एकच वेळ झाली. मुकरबखान आज छावणींत नव्हता ह्मणूनच वांचला. तो त्या दगलबाज मान्याबरोबर मांडून परवाच बादशाकडे निघून गेला ह्मणतात.

इतक्यांत एक मुसलमान शिपाई प्रवेश करितो.

शिपा०—(घाबरून) या अल्ला! इधरभी ये सैतान

खडे है ! अब जान बचानकी बडी मुष्किल. मेरे दोस्त सब कतल होगये; और मै अकेला इसतऱ्हें दुष्मनके हात मिला परवरदिगार, बचाले !

सुभा०—( तलवार उगारून त्याच्या अंगावर धांवतो ) अरे ए चोरा, लपून बसला ह्हतास ह्हय ! ( गचांडी देऊन ) झादजीराव, देऊं याला अल्लाच्या भेटीस धाडून शान ?

झाद०—सुभानबा, दीन होऊन जीव बचावण्याकरितां सैरावैरा पळत सुटलेल्या शत्रूचा सूड घेणें चांगलें नव्हे. दे त्याला सोडून किंवा हें लुटीचें सामान त्याच्या डोकीवर देऊन चालीव बरोबर. अरे, पण आपले सेनाबहादूर त्रिंबकराव व ते साताऱ्याहून आलेले सरदार इकडेसच येत आहेत वाटतें. ते पहा आलेच.

( त्रिंबकराव व खंडोबल्लाळ प्रवेश करितात. )

त्रिंब०झादबा, आपल्या लोकांना एकत्र होण्याविषयीं शिंग फुंका आणि फिरवा मोर्चा. नानासाहेबांची आणि त्या मान्याची गांठ पडली असल्यास घनघोर युद्ध माजलें असेल. चिटणीस, आमचे धाकटे धना ह्मणजे नुसती आग आहे बरें !

चिट०—अहो, असावयाचीच. संताजीराव ह्मणजे प्रति द्रोणाचार्य ! तेव्हां त्यांच्या पोटीं अश्वत्थामाच जन्मास यावयाचा. पण नागोजीरावही शत्रु पक्षाकडचा असला तरी कडवा सरदार आहे बरें ! तेव्हां तुह्मी ह्मणता तसा घोर संग्राम झाल्यावाचून राहणार नाहीं. तर चला, आता आपण आधीं तिकडेसच जाऊं. पर-

शुरामपंतांना मी मागील सर्व व्यवस्था सांगितली आहे. ते व भवानराव इकडचा बंदोबस्त राखितील. चला.

म्हाद०—सरकार, तें पहा तिकडे आकाश धुळीनें भरून गेलेलें दिसतें. शत्रूंची दाणादाण उडाली असावी. ( इतक्यांत ' हरहर महादेव ' अशी गर्जना ऐकूं येते. )

चिट०—त्रिंबकराव, म्हादबा तुह्मी सांगितल्याप्रमाणें घोडेस्वारांचे पथक घेऊन मागाहून येईल. आह्मी पुढें होऊं. हा पहा, चांगला सूर्योदय तर झालाच.

त्रिंब०—म्हादबा, शिंग फुंका आणि लवकर तयार व्हा. आह्मी निघालों. ( म्हादबा शिंग फुंकतो व त्रिंबकराव आणि चिटणीस पुढें व मागाहून सर्व निघून जातात. )

---

## प्रवेश ७ वा.

### स्थळ—तेंच.

( नागोजीराव व नानासाहेब प्रवेश करितात )

नाना०—अरे दगलबाज, मारेकऱ्यासारखी अधमपणाची कृति करून आपण बादशहाच्या गळ्यांतील ताईत झालों असें वाटल्यामुळें छप्पर पलंगावर खुशाल घोरत पडला होतास नव्हे! पण हा तुझा कृतांतकाळ, तुझ्या छातीवर लाथ मारून तुला कुत्र्याप्रमाणें फरफटत खालीं ओढून काढणारा तुझा हाडवैरी जिवंत असतां तुला झोंप तरी कशी आली! झोंप हा थोडा वेळ राहणारा मृत्युच. व मेलेल्यावर शस्त्र चालविणें

ह्मणजे नामर्देपणाचें काम ह्मणून लाथेनें तुला जागा करून सामन्यास उभा रहा असें ह्मणणें भाग पडलें. नाहींपेक्षां उजाडण्यापूर्वींच तुझ्या उन्हुनित ताज्या मांसाची रात्रभर उपोषित असलेल्या गिधाडांना मेज-वानी देऊन हा राणोजी कृतकृत्य झाला असता. चल, आतां उशीर नको; ते पहा, आपलें हें द्वंद्वयुद्ध पहा-ण्याकरितां आजपर्यंत स्वराज्यासाठीं धारातीर्थीं देह अर्पण करून धन्यता पावलेले अनेक वीर व आबा-साहेब यांची अंतरिक्षांत गर्दी झाली आहे. त्यांच्या समक्ष तुझा हा अमंगळ देह धुळींत लोळवून खासा सूड उगवितों ! अरे खाटक्या, हा पिढीजाद शूर घोर-पड्यांचा वंश ह्मणजे तुला काय वाटलें रे ! !

नागो०—( दांत ओंठ चावून ) काय वाटलें! घोर-पड्यांचा वंश ह्मणजे अकलशून्य व स्वतांचें हिताहित न समजल्यामुळें फाजील स्वामिभक्ति दाखवून सर्वस्वास मुकणारा ह्मणून पाजी; दुसरें काय वाटणार! छावणीं-तील लोक बेसावध व झोपेंत असतां एकाएकीं छापा घालून माझ्या तंबूपर्यंत जिवंत सुटून आलास एवढ्यानें शेफारडून जाऊन न तोलणारे शब्द तोंडावाटें काढ-ण्यास उद्युक्त झालास होय? ओंठ पिळला असतां दूध निघणारा कालचा पोरटा तूं; तुझ्याशीं सामना काय करावयाचा! तुझा तो मूर्ख बाप हट्टानें प्राणास मुकला; तीच गत तुझी होणार ह्मणून तुला ही बुद्धि आठवली! अज्ञ पतंगासारखा दिव्यावर झडप घालून व्यर्थ या होतकरू देहाची आहुति कां देतोस?

नाना०—आहुति देतों कीं घेतों याचें प्रत्यंतर तुला थोडक्याच अवकाशांत येईल. मजसारख्या पोरानें क्षात्रविद्येची फुषारकी मारणाऱ्या तुजसारख्या थेरड्यांना लोळविलें तरच जन्म घेतल्याचें व घोरपड्यांच्या कुळांत उत्पन्न झाल्याचें सार्थक. नाहींपेक्षां आपलें कर्तव्य विसरून स्वराज्यद्रोहाचें पातक माथीं घेणाऱ्यांच्या किंवा गोड घांस मिळतो ह्मणून निलाजऱ्या श्वानाप्रमाणें शत्रूंच्या पायापाशीं शेंपूट घोळवीत लोटांगणें घालणाऱ्याच्या नीच कुळांत जन्म घेतला काय आणि डुकराच्या जन्मास येऊन विष्ठा खाल्ली काय एकच !!

नागो०—अधमा, खबरदार ! अशीं नीचोत्तरें पुनः तोंडावाटें काढशील तर जीभ छाटून टाकीन ! चल, रहा समोर उभा.

( दोघे दांडपट्ट्याचे हात खेळूं लागतात. )

नागो०—( राणोजी किंचित् दचकून मागें सरलेला पाहून ) कां, समशेरीची पहिली चमक पाहूनच डोळे दिपले वाटतें ! तुजसारख्या बेहिंमत बोकडानें सिंहाच्या अंगावर उडी टाकण्याचा यत्न केला, तर त्याचा परिणाम काय होईल हें जोशाला विचारावयास जाण्याची जरूर लागत नाहीं.

नाना०—( त्वेषानें ) अरे जा; तुझ्यासारखे सिंहाचें कातडें पांघरून क्षुद्र जनावरांना भेडसावणारे गर्दभ पुष्कळ पाहिले आहेत या घोरपड्यानें ! असले लांब कानाचे सरदार बादशहानें पदरीं बाळगल्यामुळेंच

आह्मी मूटभर मराठे तीन लाख मोंगली फौजेला आज सतत दहा वर्षे पुरून उरलों आहों! तुझ्या अंगी तितकी धमक असती, तर बाबा निःशस्त्र होऊन स्नानास निघाले असतां त्यांच्यावर शस्त्र उगारून मारेकऱ्याची कृति करण्यास तुला खचित कांहीं तरी शरम वाटली असती! मी किंचित मध्येंच थांबलों ह्मणून भ्यालों असें तुला वाटलें असेल. पण घोरपडे कुलांत जन्म घेणाऱ्यांना भीतीची बाधा आजपर्यंत कधीं झाली नाहीं व पुढेंही होणार नाहीं. या क्षुब्ध झालेल्या रणदेवतेला तुझा बळी देऊन शांत करावयाचें; तेव्हां प्रथम त्या कालिकेचें स्मरण केलें. सूड, सूड!! चल, दाखवितों तुला घोरपड्यांचय कुळाचें खरें तेज.

( पुनः लढूं लागतात व नागोजीला वार लागून निश्चेष्ट पडतो. )

नाना०—( त्याच्या छातीवर बसून ) अरे दगलबाज, तुझा प्राण गेला कीं काय? थांब; बाबांना तुझ्या जिवंत रक्ताची तिलांजली देऊन मला आपली प्रतिज्ञा खरी करावयाची आहे अद्याप. छेः! हा अगदींच बेशुद्ध होऊन पडला. अशा स्थितींत याचा शिरच्छेद करणें क्षात्रधर्माला उचित नव्हे. ( छाती वरून उठून ) याला आधीं सावध होऊं द्यावा.

( वृंदा डोक्यास मंदील बांधून व हातीं समशेर घेऊन प्रवेश करिते. )

वृंदा—हे वीरपुरुषा, मी इतकावेळ शेजारच्या तंबूंतून उभयतांच्या युद्धाचा चमत्कार पहात होतें.

कारण मी जातीची स्त्री; तेव्हां द्वंद्वयुद्ध चाललें असतां मध्यें येणें योग्य नव्हे. पण आतां प्रसंग आला ह्मणून मला पुढें येणें भाग पडलें. युद्धांत एकमेकांनीं एकमेकाला ठार करणें हा क्षात्रधर्म. पण बरोबरीचा योद्धा जखम लागून जमिनीवर पडला असतां त्याजवर हत्यार चालविणें हें मजसारख्या अबलेला देखील शोभणार नाहीं! तुह्मी तर वीरकुलोत्पन्न दिसतां. तेव्हां मी तुह्मांला प्रथम विनवून सांगतें कीं तुमचें उभयतांचें पूर्वींचें कांहीं जरी वैर असलें, तरी तें साधण्याची ही वेळ नव्हे. नागोजीराव सावध झाल्यावर युद्धाचा कायतो निकाल होईलच. पण ते असे निश्चेष्ट पडले असतां मी तुह्मांला त्यांचा प्राण कधींही घेऊं देणार नाहीं. ( नागोजीजवळ जाऊन ) छेः, केवढी जखम ही! ( मंदिलानें जखम बांधिते. )

नाना०-हे स्त्रिये, तूं दूर हो. त्या निमखहरामाला मी कधींही जिवंत सोडणार नाहीं. तू अबला; तेव्हां तुजवर मला हत्यार चालवितां कामा नये. ह्मणून सांगतों, कीं तूं या कोणत्याही भानगडींत न पडतां आल्या मार्गानें निघून परत जा. या घोरपड्यांच्या कुळाच्या कट्टया दुस्मानाचें शीर धडापासून सोडवून मी आपली प्रतिज्ञा खरी करणार.

वृंदा-तें तर ही वृंदा जिवंत असेपर्यंत आपल्याला कधींही करूं देणार नाहीं. मीही वीरकन्या आहे. तेव्हां आपल्या उपकारकर्त्यावर संकट ओढवलें असतां त्याचें साहाय्य करण्याचे कामीं स्वतांच्या जिवाकडे न

पाहतां उडी घेणें हें जें वीरकुलाचें व्रत तें या वृंदेला पाळलेंच पाहिजे. तर प्रथम माझ्याशीं लढून माझा प्राण गेल्यावर मग काय पाहिजे तें करा. सातारा सोडल्यापासून संकटांनीं सारखी पाठ पुरविलीच आहे; त्यांचा शेवट तरी होईल!

**नाना०**–( आश्चर्यानें ) कोण वृंदे! तूं येथें कशी आलीस? तूं या वेळीं न बोलतीस तर खरोखर या राणोजीच्या हातून भयंकर पातक घडणार होतें! देवानेंच खैर केली. पण आमच्या कुळाचा हाडवैरी हा अधम मान्या, तुझा उपकारकर्ता म्हणतेस व त्याच्या करितां तूं मरण्यास सिद्ध झालीस, हें गूढ काय तें मला आधीं सांग.

**वृंदा**-( मर्यादेनें दूर उभी राहून ) प्राणप्रिया, त्या दुष्ट मुकरबखानानें मला कैद करून आणून कित्येक दिवस या ठिकाणीं आपल्या छावणींत ठेविलें होतें. या रूपाला मोहित होऊन त्यानें मला वश करण्या करितां होती नव्हती तितकी प्रथम खटपट केली. परंतु ते त्याचे सारे प्रयत्न व्यर्थ गेलेले पाहून त्या मदांध राक्षसानें माझ्या पातिव्रत्यावर घाड घालण्याचें मनांत आणिलें. शेवटीं तो नराधम पापकर्म करण्यास अगदीं उद्युक्त होणार अशा भर आणीबाणीच्या प्रसंगीं त्या कुलस्वामिणीनें माझी अब्रू बचावण्याकरितां नागोजीरावांना एकाएकीं येथें आणिलें. त्यांच्या धर्मानें मी हा सुदिन पाहिला. म्हणून आपल्या पायापाशीं माझें एवढेंच मागणें आहे कीं, यांनीं आपले किंवा

आपल्या कुळाचे जरी अनंत अपराध केले असले तरी ते या दासीकडे पाहून विसरा.

( चिटणीस व त्रिंबकराव प्रवेश करितात. )

**त्रिंब०**—चिटणीस, नानासाहेबांची प्रतिज्ञा शेवटास जाऊन युद्धाचा शेवट झाला असें वाटतें. ते पहा आपले सरकार स्वस्थ कोणाशींसे बोलत उभे आहेत. पण जवळ उभी असलेली ती स्त्री कोण बरें ?

**चिट०**—त्रिंबकराव, हीच ती वृंदा. तिला नागोजी-रावानें मुकरबखानाच्या तावडींतून सोडवून आपल्या-पाशीं आणून ठेविलें असें आह्मीं काल ऐकिलें तें खरें. नागोजीराव जखमी होऊन पडल्यामुळें नानासाहेब वृंदेशीं बोलत उभे राहिले आहेत. ( नागोजी जवळ जाऊन ) अरेरे! भयंकर जखम झाल्यामुळें तींतून रक्त वाहून नागोजीरावाला मूर्छा आली आहे. नानासाहेब, आपली प्रतिज्ञा तर शेवटास गेलीच. कारण, वीराची पाठ जमिनीस लागली कीं तो जिवंत असला तरी मेलाच समजावयाचा. आपल्या वडिलांचा वध करून संपूर्ण महाराष्ट्रियांचा अपमान करणाऱ्या ह्या नागोजीचें शासन—व तेंही आपल्या हातून—होणें अगदीं योग्य होतें. त्याप्रमाणें होऊनही जर नागोजी जिवंत राहिला आहे, तर आतां त्याला आपण जीवदान द्यावें व आपल्या छावणींत नेऊन त्याची शुश्रुषा करावी हाच खरा थोरपणा होय. कारण प्रत्यक्ष हाडवैऱ्यावरही दया करण्यासारखें औदार्य जगांत दुसरें कोणतेंच नाहीं. तर चला, आतां आपण नागोजीला उचलून छावणीकडे नेऊं.

**वृंदा०**—चिटणीस, तुमचें येथें येणें अगदीं योग्य वेळीं झालें. मी एका संकटांतून सुटलें होतें खरी; परंतु हा दुसरा भयंकर प्रसंग आला होता.

**चिट०**—होय, आह्मी अगदीं वेळेवर येऊन पोंचलों.

**त्रिंब०**—चिटणीस, या वेळीं आपण न येतों तर पुढें काय प्रकार घडून आला असता कोण जाणें! सरकार, चिटणीसांची सूचना खरोखरच उदार अंतःकरणाची व घोरपड्यांच्या आजपर्यंतच्या लौकिकाला शोभण्यासारखीच आहे. तर त्यांच्या ह्मणण्यास मान देऊन नागोजीचा प्राण वांचवावा हें उत्तम.

**नाना०**—बरें; तुमची सर्वांची जर तशी इच्छा आहे तर मी नागोजीला जीवदान देतों. पण चिटणीस, तुह्मी अशा प्रसंगीं या ठिकाणीं कसे आलांत व त्रिंबकरावांची आणि तुमची गांठ कोठें पडली? आह्मी या कुलवैऱ्याचा सूड घेण्याकरितां गुत्तीहून निघाल्याची बातमी तुह्मांला पूर्वींच कळली होती वाटतें?

**चिट०**—ईशइच्छा असली ह्मणजे कोणत्या वेळीं कशा गोष्टी जुळून येतील हें कोणालाही सांगतां यावयाचें नाहीं. आह्मी जिंजीहून परत महाराष्ट्रांत जात असतां या वृंदेचे महाराजांवर व आह्मांवर अनंत उपकार झाले असल्यामुळें महाराजांनीं हिला मुकरबखानाच्या हातून सोडवून साताऱ्यास नेण्याकरितां परशुरामपंतांबरोबर सैन्य देऊन इकडे पाठविलें. त्यांच्या बरोबर मला ही जाण्याचा हुकूम झाला. कारण हुकमतपन्हा रामचंद्रपंतांनीं आतां साताऱ्यास स्वरा-

ज्याची गादी स्थापन करून महाराजांना राज्याभिषेक करण्याचें मनांत योजिलें आहे. तर त्या महोत्सवाच्या-वेळीं आपण व आपले कुलते बहिरजीराव या उभयतांनीं साताऱ्यास यावें अशी महाराजांची इच्छा आहे. ह्मणून मी आपल्यास बोलावण्याकरितां गुत्तीस निघालों होतों. पण ईशकृपेनें सर्वांच्या येथेंच गांठी पडल्या. असो; आतां आह्मीं येथें फार वेळ बोलत राहिलों, तर नागोजीची जखम बांधण्याची वेळींच तजवीज न झाल्यानें कदाचित् भलता परिणाम होईल. तर चला, आधीं याला घेऊन छावणींत जाऊं.

नाना०—चला.

( नागोजीला उचलून सर्व निघून जातात. )

## प्रवेश ८ वा.

### स्थळ—सातारा.

( राजाराममहाराज, रामचंद्रपंत, खंडोबल्लाळ, नानासाहेब, धनाजीराव, नागोजीराव वगैरे मंडळी दरबारांत बसली आहे व भालदार ललकारत आहे असा पडदा उघडतो )

राम०—सर्व सरदार व मानकरी वीरहो, संभाजी महाराजांच्यामागें आज सतत दहा वर्षें आपल्या ह्या महाराष्ट्र—देशावर व स्वराज्यावर जी संकटपरंपरा ओढवली त्यांतून आह्मी पार पडून हे सुदिन आमच्या

दृष्टीस पडतील असें कोणालाही वाटलें नव्हतें. पण दीनांचा कैवारी व सर्वसमर्थ अशा त्या प्रभूच्या कृपेनें आह्मी तशाही अरिष्टांतून निभावून या ठिकाणीं आनंदानें एकत्र जमण्याचा आज योग आला. तेव्हां आतां चिटणिसांसारख्या व हणमंते जनार्दनपंतां-सारख्या ज्या पिढीजाद सेवकांनीं आणि आपल्या सेनापतीसारख्या व राणोजीराव घोरपड्यांसारख्या ज्या रणधुरंधरांनीं भर आणीबाणीच्या प्रसंगीं स्वहिताकडे किंवा प्राणाकडेही न पाहतां अनेक श्रमसायास सोसून अजब कर्तबगारी बजाविली, त्यांच्या निःसीम स्वा-मिभक्तीचें या महोत्सवाच्या प्रसंगीं महाराजांकरवीं चीज होऊन बहुमान व्हावा, अशी या सेवकाची विज्ञप्ति आहे.

**चिट०**—पदरच्या एकंदर मंडळींची खरी योग्यता महाराज जाणून आहेतच; तेव्हां कोणतीही गोष्ट आह्मांसारख्यांनीं सरकारला सुचविली पाहिजे असें नाहीं. हुकूमतपन्हा रामचंद्रपंतांसारख्या दूरदर्शी, धोरणी, मुत्सद्देगिरींत कसलेल्या व आटोकाट शहाण-पणाच्या पुरुषाच्या हातीं भर वादळांत सांपडलेल्या ह्या स्वराज्यनौकेचें सुकाणू होतें ह्मणूनच हे दिवस आह्मीं पाहिले. प्रल्हादपंतांमागें त्यांच्यासारखा कुशल, पर्वतप्राय धीराचा व राज्यभार शिरीं घेऊन हातीं असेल त्या सामुग्रीवर महत्कार्य संपादणारा पुरुष आह्मांस लाभला नसता, तर कशाचीही आशा नव्हती. तेव्हां स्वराज्याचें कोणाच्या हातून कांहीं हित झालें असलें तर त्या सर्वांचें श्रेय रामचंद्रपंतांनाच आहे.

त्यांनीं दाखविलेल्या मार्गानें आह्मीं गेलों व त्यांत श्री भवानीच्या कृपेनें यश आलें एवढेंच. आतां, दुसऱ्यांना थोरपणा देणें हेंच मोठेपणाचें लक्षण.

धना०—चिटणिसांचें भाषण अगदीं योग्य आहे. तशा दुर्धर प्रसंगीं राज्यसूत्रें जर रामचंद्रपंतांसारख्या लोकोत्तर बुद्धीच्या व चतुर मुत्सद्याच्या हातीं नसतीं तर आह्मी, चिटणीस किंवा आणखी दुसरी कितीही शूर व राजनिष्ठ मंडळी असती, तरी त्यांच्या हातून काय होणार होतें? तर या समयास महाराजांनीं त्यांची कार्यदक्षता लक्षांत आणून त्यांचा खरोखर गौरव करावा; ह्मणजे त्यांच्या पाठीं आह्मीं आहोंच.

राजारामम०—सरदारहो, तुह्मां सर्वांचा स्वराज्यरक्षणाचे कामीं सारखा उपयोग झालेला आहे असें मी समजतों. कारण, एखादें राज्य जोडणें, तें चालविणें किंवा अनिष्टकालीं त्याचा जोम जाऊं न देतां रक्षण करणें ह्या गोष्टी एका व्यक्तीच्या हातून केव्हांही होत नाहींत. त्याला सर्वांची सारखी जोड लागते. आज रामचंद्रपंतासारखे धुरीण मुत्सद्दी आह्मांमध्यें नसते तर आह्मी संकटसमयीं वेड्यासारखे होऊन वाट फुटेल तिकडे भटकत गेलों असतों; व शत्रूंनीं आमचा राज्यक्षय, धर्मक्षय, व कुलक्षय करून मराठा हें नांव देखील राहूं दिलें नसतें यांत बिलकुल संशय नाहीं. पण त्यांच्यासारखे मुत्सद्दी असूनही जर खंडोपंतासारखे आपलेपणा राखण्याकरितां स्वसुखास लाथ मारून स्वराज्याच्या रक्षणाकरितां देह कष्टविणारे निरभिलाषी स्वामिभक्त

नसते किंवा धनाजीरावासारखे अत्यंत धाडसी व पराक्रमशाली वीर अल्पबळ असतांही शत्रूंच्या प्रचंड सैन्याशीं टक्कर देण्यास दंड थोपटून उभे राहिले नसते, तर आमचा टिकाव कसा लागता ? शिवाय दुर्दैवामुळें मध्यंतरीं आपसांत बखेडा माजून सर्वच विस्कटविस्कट होण्याचा जो समय आला होता तशा नाजूक व खऱ्या परीक्षेच्यावेळीं प्रत्यक्ष वडिलांवर गुदरलेला प्रसंग विसरून जाऊन केवळ स्वराज्याकरितां रात्रंदिवस जीव आटविणारे राणोजीरावासारखे स्वाभिमानी सरदार आमचा पक्ष सोडून शत्रूंस मिळाले असते, तर कितीही शहाणा मनुष्य असता तरी काय करणार होता ? परंतु श्री समर्थांच्या आशीर्वादानें व वडिलांच्या पुण्याईनें सर्व गुणांच्या मंडळींची आह्मांस जोड मिळाल्यामुळें या हिंदुपदाचें रक्षण झालें. आतां ह्या सर्व कर्त्या मंडळींमध्यें रामचंद्रपंतांची पाहिरी श्रेष्ठ यांत शंका नाहीं. तेव्हां मी त्यांना पंतअमात्य हें पद व सरंजाम देऊन त्यांचा गौरव करितों; तो त्यांनीं मान्य करावा. आजपासून स्वराज्याचे पंतअमात्य रामचंद्रपंत. त्यांच्या हुकूमतीनें पुढील सर्व राज्यकारभार चालावयाचा.

राम०—महाराज हा जो आज माझा मान करीत आहेत त्या मानाला मी पात्र असेन असें मला वाटत नाहीं. आतां, स्वराज्याची यत्किंचित् सेवा माझ्या हातून झाली असल्यास मी आपलें कर्तव्य बजावलें; यापेक्षां जास्त कांहीं नाहीं. त्याबद्दल मला एवढा बहुमान नको.

धना०-महाराजांनीं कृपावंत होऊन व खऱ्या गुणांची पारख करून रामचंद्रपंतांचा जो हा बहुमान केला तो पाहून दरबारांतील एकंदर मंडळीस आनंद होत आहे. तर त्यांनीं त्याचा स्वीकार करून जास्त उमेदीनें स्वराज्याची सेवा करावी, अशी आमची त्यांस विनंति आहे.

राजा०-खंडोपंतांनीं तर आपल्या स्वामिभक्तीची कमाल करून पोटच्या गोळयाचा जीव धोक्यांत घातला व शिर्के बंधूंशीं राजकारण करितांना आपल्या दाभोळच्या वडिलार्जित उत्पन्नावरही पाणी सोडण्यास ते तयार झाले. पूर्वी संभाजीराजे यांणीं त्यांचा बाप, भाऊ व चुलते ठार मारले असतांही तें मनांत न वागवितां स्वराज्याची एकनिष्ठेनें जी त्यांनीं सेवा केली त्याबद्दल त्यांस चौलप्रांतीं पंचवीस हजारांचें सरदेशमुखी व नाडगौडीचे उत्पन्न इनाम दिलें आहे. तर त्याचा वंशपरंपरा उपभोग घेऊन गादीची सेवा करीत जाणें. हणमंते जनार्दनपंत जरी आज हजर नसले तरी ते जिंजी मुक्कामीं फार उपयोगी पडले असल्यामुळें प्रतिनिधीचे जागीं त्यांची नेमणूक केली असून धनाजीरावांना नवीन दिलेलें सेनापति पद कायम केलें आहे.

चिट०-महाराज आश्रितांचे कल्पतरु असल्यामुळें त्यांनीं पदरच्या कित्येक मंडळींची जी सरफराजी केली ती योग्यच आहे. परंतु मजसारख्या यःकश्चित् सेवकाला सरकारची कृपा हेंच बक्षीस. दुसरें इनाम नको होतें.

**राजा०**—आतां वृंदेचें पातिव्रत्य व स्वराज्य रक्षणा- करितां तिनें दाखविलेलें धैर्य हीं इतकीं अद्वितीय आहेत कीं, त्यांस अनुरूप असें बक्षीस काय द्यावें हें मला सुचत नाहीं. तथापि तिला बहिणीच्या ठिकाणीं मानून तिच्या हेतुप्रमाणें सुमुहूर्तावर राणोजीरावाशीं तिचा विवाह करून द्यावा व राणोजीरावांनीं जी खरी राजनिष्ठा दाखविली त्याबद्दल त्यांना व त्यांचे चुलते बहिरजीराव यांना गुत्ती आणि सोंडूर येथील जहागिरी वंशपरंपरा द्यावी असें मनांत योजिलें आहे. तर येथून गेल्यावर त्यांनीं गुत्ती येथें आनंदानें राहून कर्नाटकचें रक्षण करावें.

**राम०**—महाराजांचा हा योजकपणा व पदरच्या एकंदर मंडळींना सारख्या प्रेमानें वागविण्यामध्यें दिसून येणारी त्यांच्या मनाची समता पाहून कोणालाही आनंद झाल्यावांचून राहणार नाहीं.

**राजा०**—रामचंद्रपंत, आतां नागोजीरावाच्या हातून पिढीजाद वैरामुळें आपल्या वीरश्रेष्ठ सेनापति संताजी- रावांचा वध होऊन कधींही भरून न निघणारी अशी जरी स्वराज्याची हानि झाली आहे, तरी राणोजीरावांनीं उदार अंतःकरणानें त्यांचा जीव वांचविला असल्यामुळें व मागें एका प्रसंगीं त्याने स्वतां आमच्या उपयोगीं पडले असल्यामुळें त्यांनीं आतां शत्रुपक्ष सोडून म्हसवडचे देशमुखी उत्पन्न अनुभवीत या गादीची सेवा करण्यांत राहिलेलें आयुष्य घालवावें.

( शिपाई हणमंतरावास पायांत बेड्या घातलेला असा घेऊन येतात. )

हण०—राजाधिराज, आपण गोब्राह्मण—प्रतिपालक आहांत. तेव्हां मी राजद्रोहासारखीं भयंकर पातकें व अनंत अपराध जरी केले आहेत, तरी राज्याभिषेकोत्सवासारख्या मंगलप्रसंगीं मला सर्व अपराधांची माफी असावी. एरव्हीं मी देहांत शासनासच पात्र आहे.

राजा०—रामचंद्रपंत, जळजळीत निखाऱ्यावर याचा देह शतशः जरी होरपळून काढला किंवा हजारदां याचा कडेलोट करविला तरी याच्या पातकांस पुरेसें प्रायश्चित्त होणार नाहीं. पण ब्रह्मवधाचें पातक शुभकार्याचे वेळीं माथीं येऊं नये ह्मणून मी याला वसंतगडावर आजन्म अटकेंत राहण्याची शिक्षा देतों. तर त्याला आतां येथून घेऊन चला.

( शिपाई त्यास घेऊन जातात )

आतां सर्व मानकरी व सरदारहो, तुह्मांला माझें शेवटीं एवढेंच सांगणें आहे कीं, आज आपण जरी हे सुदिन पाहिले आहेत तरी शत्रूंचा शिलशिलाट आपल्या मागचा अद्याप संपला नाहीं. तर त्यांना नर्मदापार घालवून देईपर्यंत विश्रांति घेतां कामा नये हें लक्षांत वागवा; आणि आजपर्यंत तुह्मीं जसे एकदिलानें वागून रणांगणांत शौर्य गाजविलेंत व आपल्या यशोदुंदुभीनें संपूर्ण भरतखंड दुमदुमून सोडलेंत, तद्वत् पुढेंही पराक्रम करून लौकिक संपादा; ह्मणजे पुढील

ततीचे खरे हितकर्ते अशी तुमची सर्वंजग कीर्ति गाईल.

( हारतुरे अत्तरगुलाब वगैरे वांटतात )

राजा०—रामचंद्रपंत, आतां काय तुमची इच्छा ाहिली आहे ?

राम०—महाराज, सर्व आयुष्यांत धन्य वाटण्यासार- ा आजचा सुदिन ज्या प्रभूच्या कृपेनें उगवला ्याजपाशीं आतां शेवटचें हेंच मागणें आहे.

( शुद्धकामदा )

जगतिं श्रेष्ठ ही आर्यभू जरी ॥
बहुत कष्टली पाहिं अंतरीं ॥
सुखवि तीजला बा कृपाघना ॥
दुरित वारुनी तोषवी जना ॥

सर्व—तथास्तु.

( सर्व निघून जातात व पडदा पडतो )

---



# शुद्धिपत्रक.

| पान | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १३ | २ | गोविंदराव | हणमंतराव |
| २९ | १४ | नारो० | नागो० |
| ३१ | २१ | ळेकें | केळें |
| ३४ | ७ | दानवाणी | दीनवाणी |
| ,, | १९ | बालावा | बोळवा |
| ४८ | २४ | व्हाई | न्हाई |
| ५२ | १५ | थाब | थांब |
| ८० | १० | बसाप्पा बेळ्ळी | बसाप्पा बळ्ळोळी |
| ८९ | ६ | बहि० | वृंदा |
| ९६ | ९ | समर्थांनीं | शिवदिनकेसरी यांनीं |
| ,, | २९ | शास्त्राची | शास्त्राची |
| १०२ | १३ | बगनवी | बगनबी |
| ११७ | १६ | दुखाचे | दुःखाचे |
| १२१ | ९ | हग | हम |
| १२६ | ६ | उजवा | डावा |
| १२८ | ७ | घडायल | घडायला |
| १३६ | १८ | चपाटे | चपेटे |
| १४१ | ९ | गाष्टी | गोष्टी |
| १६७ | १३ | कोणयाही | कोणत्याही |
| १८९ | १४ | स्वताचे | स्वतांचे |
| २०० | २१ | सरफराजा | सरफराजी |